भूदानयात्रेच्या निमित्तानें प्रत्यक्ष घडलेलें सामाजिक अवलोकन :–डॉ. सत्यपाल ठाकूर

# कोल्हापूर जिल्ह्याचें ओझरतें सामाजिक दर्शन

" पाहुणे, आपण सांगतां म्हणून विश्वास ठेवतों. आम्हांला असें सांगण्यांत आलें आहे कीं, हिंदुस्थानांतून इंग्रज गेले आणि त्यांच्या जागीं अमेरिकन तंत्रानें चालणारे नेहरू नांवाचे भांडवलदारांचे हस्तक आज हिंदुस्थानचें राज्य चालवीत आहेत. "–कोल्हापूर जिल्ह्यांतील एका गांवामध्यें व्याख्यान देत असतांना हिंदुस्थान स्वतंत्र झाला आहे, आपलें हित पाहाणारीं माणसें आपणावर गेलीं पांच-सहा वर्षें राज्य करीत आहेत असें आम्हीं सांगितल्यावर, वर अवतरणचिह्नांत दिलेले शब्द एका तीस-पसतीस वर्षांच्या सुशिक्षित शेतकऱ्यानें आम्हांला ऐकविले. अशाच धर्तीच्या इतर गांवागांवांतून ऐकलेल्या शब्दांनीं कोल्हापूरच्या खेडेगांवांतील जनतेची राजकीय प्रगति आम्हांला दिसत होती.

महाराष्ट्रांतील, शक्य तोंवर प्रत्येक, खेड्यांचें स्वतः सत्यदर्शन घ्यावें, त्यांची सध्यांची परिस्थिति पाहावी, त्यांच्या उन्नतीबद्दल शक्य तर प्रयत्न करावा, अशी इच्छा माझ्या मनांत बऱ्याच वर्षांपासून घोळत होती. ज्या वेळीं मला श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे म्हणाले कीं, ते महाराष्ट्राचा भूदानयज्ञाच्या निमित्तानें पायीं दौरा काढणार आहेत तेव्हां तर माझ्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आतां तर पू. अण्णांच्या संगतींत मला प्रत्यक्ष महाराष्ट्राच्या हृदयाची ओळख करून घेतां येणार होती. ह्याच कारणास्तव मीं पू. अण्णांना विनंति केली व त्यांनीं मला आपल्याबरोबर यायची परवानगी दिली. भूदान-यज्ञाच्या निमित्तानें श्री. अण्णासाहेबांकडून हिंडला गेलेला महाराष्ट्रांतील पहिला जिल्हा म्हणजे कोल्हापूर होय. कोल्हापूर जिल्ह्यामध्यें आम्ही १५–१०–५२ पासून १०–११–५२ पर्यंत पायीं हिंडलों. ह्या सत्तावीस दिवसांच्या प्रवासांत सुमारें २३६ मैलांची पदयात्रा केली, सुमारें ऐंशीं खेड्यांना भेटी दिल्या, ६० सर्वसाधारण सभा घेतल्या, सुमारें ३५ ठिकाणीं मुद्दाम हरिजनवाड्यांना भेटी देऊन त्यांची परिस्थिति प्रत्यक्ष पाहिली व चार खास स्त्रियांसाठीं वेगळ्या अशा सभा घेतल्या. ह्या सत्तावीस दिवसांच्या दौऱ्यामध्यें आम्ही भेट दिलेल्या प्रत्येक खेड्याच्या अडीअडचणी पाहात होतों, त्यांच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक व दैनंदिन परिस्थितीचा अभ्यास करीत होतों, दुःखाशीं व सुखाशीं समरस होण्याचा प्रयत्न करीत होतों. महाराष्ट्रांतील जिल्ह्यांमध्यें राजकीय आकांक्षांमध्यें प्रगतिपर, आर्थिक दृष्ट्या सधन व सुखवस्तु, शैक्षणिक दृष्ट्या पुढारलेला व जातीय वादांमध्यें मागें न राहणारा असा कोल्हापूर जिल्हा आहे. इतकेंच नव्हे तर, महाराष्ट्राच्या इतिहासांत ऐतिहासिक दृष्ट्या देखील कोल्हापूर जिल्ह्याला बरेंच महत्त्व आहे. त्या दृष्टीनें आमच्या दौऱ्यांत मला जें कांहीं गांवांतून व शहरांतून विशेष दिसून आलें तें पुढें संक्षेपानें दिलें आहे.

लहान-मोठ्या खेडेगांवांना अगर मध्यम वस्तीच्या शहरांना भेटी देतांना एक गोष्ट अत्यंत प्रामुख्यानें आढळत होती आणि ती म्हणजे स्वच्छता आणि ग्रामसफाई ह्या दोहोंचा गांवाशीं असलेला पूर्वींचा संबंध तुटून बऱ्याच पिढ्या होऊन गेल्या आहेत ! ह्याच कारणास्तव साधारणपणें नवीन गांवामध्यें आम्हीं प्रवेश करण्यास सुरुवात केली कीं रस्त्याच्या कडेची घाण व दुर्गंधी आमचें प्रथम स्वागत करीत असे आणि नंतर नागरिकांतर्फें आमचें स्वागत होत असे. ह्या उलट, गांवांतून आम्ही बाहेर पडूं लागलों म्हणजे आम्हीं स्वच्छ व आल्हाददायक हवेमध्यें रमून जात असूं. ह्या गोष्टी नित्य परिचयाच्या असल्यामुळें आम्हांला एखादें नवीन गांव लागलें कीं नाहीं हें ओळखणें कठीण जात नसे.

मिणचें ह्या गांवाचें मुख्य महत्त्व म्हणजे हें गांव वरील नियमाला संपूर्ण अपवादात्मक म्हणूनच म्हणावें लागेल. ता १८।१०।५२ रोजीं सकाळीं ६–३० ला आम्ही ह्या गांवांत नेहमींच्याच अपेक्षेनें शिरलों आणि गांवाची स्वच्छता पाहून








आम्ही आश्चर्यचकित झालों ! सर्व गांवांत फेरी मारली आणि गांवाची स्वच्छता पाहिल्यावर आम्हांला संपूर्ण समाधान वाटलें. या गांवानें सामुदायिक श्रमानें बारा शौचकूपांचा एक गट असे स्त्रियांसाठीं तीन निरनिराळ्या ठिकाणीं शौचकूप-गट बांधले असून, भंगी वगैरे नोकर न ठेवतां गांवकरी ते शौचकूप सामुदायिक श्रमानें स्वच्छ करतात व मलमूत्रापासून खत बनवितात. त्याचप्रमाणें गांवांतील सर्व कचऱ्या पासून कंपोस्ट खत बनविण्यासाठीं 'कंपोस्ट खड्डे' सुव्यवस्थित परिस्थितींत आहेत. गांवाची लोक-संख्या अजमासें २००० असून ती ¼ मराठे, ¼ जैन, ¼ हरिजन, ¼ मुसलमान अशी विभागलेली आहे. गांवासाठीं सामुदायिक काम करण्याच्या दृष्टीनें ह्या जमातींत एकोपा आहे. गांवामध्यें ग्रामपंचायत नसून ग्रामसुधारणा-मंडळ आहे व त्या मंडळाचें मुख्य लक्ष गांवाच्या सुधारणेकडेच दिसलें. ह्या गांवाचा विशेष म्हणजे सरकार, लोकल बोर्ड वगैरेतर्फे जाहीर झालेलीं सामुदायिक श्रमाचीं व ग्रामसुधारणेचीं बहुतेक सर्व बक्षिसें ह्या गांवानें मिळविलेलीं आहेत, मिणचें गांवांत एकंदर चार सोसायट्या आहेत, त्यांपैकीं दोन क्रेडिट व एक धान्य-सोसायटी आहे.

निसर्गरम्य अशा टेकाडावर वसविलेल्या बाहुबली नांवाच्या स्थानाला धार्मिक महत्त्व आहे. येथें जैन मंदिरें असून त्यांत दिगंबर, श्वेतांबर वगैरे तीनहि पंथांचे जैन लोक आढळतात. टेकाडाच्या पायथ्याशीं जैन लोकांनीं त्यांच्याच जातींतील विद्यार्थ्यांसाठीं बांधलेलें विद्यालय आहे. ह्या विद्यालयांतील विद्यार्थ्यांची विद्यालयांतच राहण्याची, जेवणाची वगैरे सर्व व्यवस्था आहे. विद्यार्थ्यांना धार्मिक शिक्षण, सामुदायिक श्रमानें शेती करणें, अन्न शिजविणें वगैरे विद्यार्थि जीवनाला आवश्यक गोष्टी शालेय शिक्षणाच्या शिवाय अधिक म्हणून शिकविल्या जातात. नळाच्या पाण्याची व विजेची सोय विद्यालयांत आहे. येथील सर्वांत मोठी न्यूनता म्हणजे येथें स्वच्छतेसाठीं कांहींहि व्यवस्था नाहीं, येथें संडास नाहींत व ठिकठिकाणीं उकिरडे निर्माण करण्यांत आलेले आहेत. त्यांच्याशीं झालेल्या संभाषणावरून असें दिसलें कीं, त्यांना स्वच्छतेची आवश्यकताहि वाटत नाहीं !

बाहुबलीं हें ठिकाण पाहिल्यावर मला चितोडगडाची आठवण झाली. चितोडगडामध्यें जावें तर राणी पद्मिनी, राणा संग, राणा प्रताप, कर्मवती देवी, मीराबाई वगैरे मोठमोठे रजपूत वीर व राजपुतानियाँ आपापल्या अतुलनीय कार्याची साक्ष देतात, तर खालीं चितोडमध्यें असलेल्या ब्रह्मचारी विद्यालयांतील गुरुवर्य "स्वच्छता निर्माण करणें हें आमचें काम नव्हे, तें भंग्याचें काम आहे" असें मोठ्या आग्रहानें प्रतिपादितात !

पंचगंगा व कृष्णा ह्या दोन नद्यांच्या नयनमनोहर संगमावर नरसोबाची वाडी वसलेली आहे. दर पावसाळ्यांत जेव्हां नद्यांना पूर येतो त्या वेळीं देवालय पाण्याखालीं असतें. देवालयांतील मूर्ती दुसऱ्या जागीं हालविल्या जातात. नदीच्या दुसऱ्या कांठावर असलेल्या कुरुंदवाड शहराचाहि बराचसा भाग पाण्याखालीं असतो. ह्या पुरामुळें, पाणी उतरूं लागल्यानंतर, सबंध देवालय व बाजूचा भाग चिखलमय होतो. पावसाळ्याच्या शेवटीं हा चिखल धुऊन काढतात व मंदिराला एकदां रंग देऊन देवालयांत परत मूर्ति आणून ठेवतात. कुरुंदवाडपासून येथें येण्याला पावसाळ्यांत व पाणी जास्त असतांना नावेनें वाहतूक चालू असते. उन्हाळ्यांत पायीं जाणें शक्य असल्यामुळें नाव बंद असते.

कुरुंदवाड हें एक मध्यम वस्तीचें व बऱ्याचशा आधुनिक सुखसोयींनीं परिपूर्ण असें शहर आहे. कुरुंदवाड येथील महत्त्वाची गोष्ट म्हणजे आमची हरिजनवस्तीला भेट. गांवांत काय अगर शहरांत काय हरिजनांची परिस्थिति अत्यंत केविलवाणी आहे. कायद्याप्रमाणें त्यांना समानता आहे, त्यांना मंदिरप्रवेश आहे, सवर्ण हिंदूंबरोबर एकाच विहिरीवर अगर एकाच ठिकाणीं पाणी भरण्याची सोय आहे. पण प्रत्यक्षांत मात्र त्यांच्यामध्यें भीतीचा लोप झालेला दिसला नाहीं. गांवकरी लोक आपणाला वाळींत टाकतील, आपणावर सामाजिक बहिष्कार पुकारतील, आपणाला कामाला बोलावणार

नाहींत, मोलमजुरी मिळणार नाहीं व ह्यांपैकीं एक किंवा अनेक गोष्टींमुळें आपल्या सध्यांच्या दैन्यावस्थेमध्यें आणखी भर पडेल अशी हरिजनांना साधार भीति वाटते. स्पृश्य हिंदूच त्यांना वाईट वागवतात असें नाहीं. महारांच्या विहिरींवर चांभार पाणी भरीत नाहींत; चांभारांच्या आणि महारांच्या विहिरीवर मांग लोक पाणी भरीत नाहींत. येथें मीं हरिजनांतील पुष्कळच स्पृश्यास्पृश्यता पाहिली.

बहुतेक प्रत्येक गांवामध्यें महारांना म्हारकीची जमीन आहे. पण जेथें जेथें रयतवारी आली तेथें तेथें ती जमीन त्यांच्या आपापसांतील भांडणांमुळें विकली जाऊन आज दुसरेच कोणी तरी त्या जमिनीचे मालक झालेले आहेत. बऱ्याच ठिकाणीं मला असें दिसलें कीं, गांवांतील मातबर लोकांनीं त्यांची जमीन बळकावण्याच्या इरादानें त्यांच्यामध्यें भाऊबंदकीचीं भांडणें लावून दिलीं, त्यांना कोर्टाचे अनुभव दिले व स्वतः जमीन बळकाविली. हरिजनांमध्यें व शेतमजुरांत (–आज हरिजनांमधील बरेचसे लोक शेतमजूर ह्याच सदरांत मोडतात–) आज काम करण्याची ताकद राहिलेली नाहीं. त्यांना राहण्यासाठीं देखील पुरेशी जागा नाहीं. दारिद्र्यामुळें त्यांचें जननसामर्थ्य पुष्कळच प्रमाणांत वाढलें असून त्यांच्या बेकारींत जास्त जास्त भर पडत आहे. घरांतल्या घरांत आतां त्यांनीं वेगवेगळ्या चुली केलेल्या आहेत. सुमारें २० फूट × ३० फूट एवढ्या घरवजा झोपडीमध्यें कांहीं कांहीं प्रसंगीं दहा ते बारा चुली आढळल्या. म्हणजेच तेथें दहा-बारा कुटुंबें राहत आहेत.

अशी घरांची परिस्थिति पाहिल्यामुळें लोकांनीं हाऊसिंग सोसायटी काढावी व आपली राहण्याच्या जागेची टंचाई सोडवावी अशी इच्छा आम्हीं प्रदर्शित केली. ह्याला २१ ऑक्टोबर रोजीं कुरुंदवाड येथें पुढील प्रकारचें उत्तर मिळालें :

"साहेब, ह्या महारवाड्यासारखा आणखी एक महारवाडा गांवाच्या बाहेर बांधावा अशी आमची इच्छा नाहीं. तुम्हां ब्राह्मणांमध्यें, मराठ्यांमध्यें, स्पृश्यांमध्यें आम्हांला एक एक घर बांधण्यासाठीं व राहण्यासाठीं परवानगी द्या. तुम्ही तुमच्या सहवासानें व संगतीनें आम्हांला सुधारण्यासाठीं मदत करा. कृपा करून एक नवीन महारवाडा बांधण्याची योजना आमच्यावर लादूं नका. अजूनपर्यंत पुष्कळ वेळां मोठमोठे ऑफिसर, प्रचारक, पुढारी वगैरे लोक आमच्याकडे येतात. ते आम्हांला सुधारण्याच्या व आम्हांला मदतीच्या थापा मारतात व परत तोंड दाखवीत नाहींत. असें झाल्यामुळें पोकळ आश्वासनांवरचा आमचा विश्वास उडत चालला आहे."

एक-दोन गांवांमध्यें हरिजनमुलें एस्. एस्. सी. ची परीक्षा उत्तीर्ण झालीं होतीं. त्यांच्या सांगण्याप्रमाणें कांहीं दिवस ते टेंपररी नोकरी करीत होते, पण सध्यां ते बेकार आहेत. शिकलेल्यांची बेकारी पाहून तेथील हरिजनांनीं आपल्या मुलांना शाळेंतून काढून गुरें, मेंढरें वगैरे राखण्याकरितां घरांतच ठेवून घेतलें आहे. "तुम्हीं आपल्या मुलांना शाळेंतून काढून घरीं कां ठेवलें?" ह्या प्रश्नाचें उत्तर, "शिकून नोकऱ्या नाहींत त्या नाहींत; बेकारी वाढत आहे; शिक्षणानें हीं मुलें पांढरपेशी बनलीं आहेत व श्रम करावयाला नालायक होऊन आम्हां सर्वांवर त्यांचा भार पडत आहे. पोटाला मिळाल्याखेरीज व खाण्याची चिंता नाहींशी झाल्याखेरीज आम्ही मुलांना व्यवस्थितपणें कसें बरें शिकवूं शकूं?" असें मिळालें.

प्रत्येक खेडेगांवांत शेती अगर शेतमजुरीशिवाय हरिजनांतील महारांचा एक सर्वसाधारण उद्योग म्हणजे मेलेलें ढोर घेऊन जाणें, त्या मेलेल्या ढोरांचें मांस स्वतःला खाण्यासाठीं वापरणें आणि मेलेल्या ढोरांचें चामडें विकून आलेल्या पैशांपैकीं निम्मे पैसे मालकाला देणें. ज्या ज्या खेडेगांवांना आम्हीं भेटी दिल्या त्यांत असें आढळलें कीं, हरिजनांच्या मुलांपैकीं फक्त कांहीं मुलगेच तेवढे शाळेंत जातात; एकाहि खेड्यांतील एकहि हरिजनकन्या शाळेंत गेलेली अगर जात असलेली आढळली नाहीं. हरिजनांची ही दैन्यावस्था पाहून मला हिंदु लोकांची माणसें दूर ढकलण्याची, माणसांना हीन लेखण्याची व त्यांना चांगल्या परिस्थितींतून उठवून दुःस्थिति निर्माण करण्याची संवय व त्या-

साठीं त्यांची खर्च होत असलेली अमूप ताकद पाहून विषाद वाटला !

मुसलमानांनीं उत्तर-भारत पादाक्रान्त करण्याला जेव्हां सुरवात केली तेव्हां त्यांनीं त्याजबरोबर धर्मप्रसारालाहि सुरुवात केली. त्या परिस्थितींत 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥' असें मनाशीं बाळगून, मोठया अभिमानानें व हिंदु-धर्माची उज्ज्वल परंपरा राखण्याच्या उद्देशानें बरेचसे रजपूत लोक गुजरातेमध्यें आले. तेथील हिंदु लोकांनीं त्यांना नेहमींच्या नियमाप्रमाणें स्वतःमध्यें सामावून न घेतां वाळींत टाकलें व हरिजनांतील अत्यंत निंद्य असें भंगीकाम त्यांच्या माथीं मारलें. सध्यां अस्तित्वांत असलेला महाराष्ट्रांतील भंगीसमाज ह्याच लोकांचा बनलेला आहे. माणसांना हीन लेखण्याची व त्यांना हीनच ठेवून त्यांची उन्नति करण्यांत अडथळे निर्माण करण्याची हिंदुसमाजाची ताकद अपार आहे ! मला स्वतःला हरिजन आणि इतर हीन व नीच मानल्या जाणाऱ्या समाजांतील घटकांच्या ह्या 'जळू-वृत्ती'चें अत्यंत आश्चर्य वाटतें. इतके लाथाडले जात असतांना देखील ते अजून धर्माला इतके घट्ट चिकटून कां, हें समजत नाहीं.

कांहीं खेड्यांमधील हरिजनकुटुंबांपैकीं कांहीं कुटुंबांनीं युद्धकाळामध्यें ख्रिस्तीधर्म स्वीकारला. ह्या लोकांची आजची परिस्थिति इतर हरिजनांपेक्षां जास्त दैन्यावस्थेला गेली आहे. ख्रिस्ती असल्यामुळें त्यांना हरिजन-कायद्यांचे फायदे मिळण्यांत पुष्कळच अडचणी आहेत. त्यांची दैन्यावस्था दिवसेंदिवस वाढत आहे. एका मिशनऱ्याबरोबर माझा सहज संवाद चालला होता. सध्यांची ख्रिस्ती झालेल्या हरिजन लोकांची परिस्थिति हा विषय. तो मला म्हणाला : "आम्हांला हिंदुस्थानांत ख्रिस्ती झालेल्यांची आर्थिक परिस्थिति बदलण्यामध्यें अत्यंत कमी यश आलें. त्याचें कारण ह्या गरीब लोकांचें अगतिकत्व व जळू-वृत्ति. एखाद्या चांगल्या जागीं आम्ही त्यांना नेऊन स्थायिक करूं शकलों असतों तर ह्यांच्या आर्थिक व सामाजिक आचार-विचारांत खात्रीनें बदल झाला असता."

गांवांत सध्यां तेथील हरिजनांना कसें वागवितात ह्याचें मला एक प्रात्यक्षिक मिळालें. कोल्हापुरांतील एका गांवीं आमचा मुक्काम होता. तेथें एका ब्राह्मणाकडे माझी जेवण्याची व्यवस्था करण्यांत आली. मंडळी घरामध्यें ताटांतून जेवण्याला बसली होती व मला बाहेर पडवीमध्यें, जिच्यावर संपूर्ण जेवण आधींच वाढलेलें होतें, अशी पत्रावळ ठेवली होती. मी जेवायला बसल्यावर "पत्रावळ उचलून टाका व जेवणाची जागा स्वच्छ करा" अशी त्यानें मला आज्ञा दिली. मला त्याच्यांत विशेष कांहीं वाटलें नाहीं, पण मी परत आल्यावर, "शिंद्यांच्याऐवजीं तुम्हांला तेथें पाठविलें गेलें" असें सांगितलें तेव्हां त्या ब्राह्मणाच्या कृतीचा अर्थ माझ्या ध्यानांत आला.

पट्टण कोडोली ह्या मुक्कामीं तर हरिजनांना राहण्याच्या जागेची कमतरता, पिण्याच्या पाण्याचा त्रास व बेकारी हे तीनहि प्रश्न आपापल्या प्रखरतेनें दिसत होते. ह्या ६००० लोकवस्तीच्या शहरांत सुमारें १/४ हरिजन आहेत व ते ७०-८० लहान लहान खोपट्यांत राहतात. आमच्या व्याख्यानाला गांवांतील मध्यम शेतकरी, शेत-मजूर व हरिजन ह्यांचा नेहमींच भरणा असावयाचा, हा एक नियमच झाला होता. व्याख्यान संपतां संपतांना कांहीं हरिजन उभे राहिले व म्हणाले, "आम्ही सर्व बे-जमीन आहों व आपलें व्याख्यान ऐकावयाला आलों आहों. आपण जमिनीचें दान केलें पाहिजे म्हणून सांगत आहांत. आम्ही ती गोष्ट ऐकत आहोंत. जमिनीचें दान करण्यासाठीं स्वतःजवळ जमीन असावी लागते. जमीन धारण करणारे जमीनदार तर घरांना कड्या लावून झोपले आहेत. आम्ही ह्या जमीनदारांना पुष्कळ वर्षें ओळखत आहोंत. हे लोक आमचें मढें जाळावयाला देखील जागा देणार नाहींत तर हे तुम्हांला जमीन देतील असा विचार देखील मनांत आणूं नका." शेवटचे शब्द ऐकून तर आमचें सर्वांचें हृदय विदीर्ण झालें.

इचलकरंजी ह्या शहरीं तर आम्हांला सर्वसाधारण लोकांची परिस्थिति दिवसेंदिवस बिघडत असलेली आढळली. आज पेठेमध्यें एकंदर चार लक्ष लुगडीं व पातळें पडून आहेत. हातमाग










व इतर विजेचे माग बंद पडत आहेत. कारण तयार झालेल्या मालाला गिऱ्हाईक नाहीं. बेकारी वाढत आहे.

शेंडूर येथें आम्हीं सर्वोदय-केंद्रामध्यें मुक्काम ठेवला होता. येथें सर्वोदयाचें काम चालूं होऊन एक वर्षापेक्षां जास्त काळ होऊन गेला आहे. सर्वोदय येथें चालू झाल्यापासून गांवांत काय काय सुधारणा झाल्या तें पाहण्याच्या उद्देशानें मी गांवांत फिरलों. खेडेगांवांत अत्यंत कमी खर्चांत व कमी त्रासामध्यें होणारा व प्राथमिक महत्त्वाचा असा स्वच्छतेचा कार्यक्रम सर्वोदयानें येथें हातांत देखील घेतलेला नाहीं असें दिसून आलें. अर्थात् केरकचरा व मलमूत्रापासून कंपोस्ट, सोनखत, हिरावत वगैरे बनविण्याची कांहींहि व्यवस्था नव्हती. ह्या सर्व गोष्टी गांवाच्या अस्वच्छतेमध्यें आणखी भर टाकीत होत्या. इतकेंच काय पण, सर्वोदय केन्द्रांतील कार्यकर्त्यांसाठीं बांधण्यास प्रारंभ केलेले शौचकूप आज देखील (२५-१०-५२) अर्धवट बांधलेल्या स्थितींत आहेत! गांवांत एक शाळा असून सर्वोदयाच्या योजनेनुसार येथें सूतकताईचें शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. सूतकताई शिकविणाऱ्या शिक्षकांनीं आपण कार्डबोर्ड तज्ज्ञ आहोंत व सूतकताई हा आपला विषय नव्हता असें सांगितलें. सर्वसामान्य जनतेमध्यें, सर्वोदय हें एक सरकारी खातें (department) असून त्यांत काम करणारे कार्यकर्ते सरकारी नोकर असून बडा बडा पगार खातात, असा समज दिसला.

मुरगूड शहरामध्यें भूदानासाठीं जमीन मिळविण्याच्या खटपटींत असतांना 'सुंभ जळला तरी पीळ जळत नाहीं' ह्या म्हणीची आठवण करून देणारा एक प्रसंग घडला. सुमारें ७५ वर्षें वयाच्या निपुत्रिक जमीनदाराकडे आम्ही गेलों असतांना त्याच्या ७० वर्षांच्या पत्नीनें आमचें स्वागत केलें. आम्हांला ते म्हणाले, "सध्यां मी एक दत्तक घेण्याचा विचार करीत आहे. पण दत्तक मुलगा माझ्या संपत्तीवर लक्ष ठेवील, माझ्याशीं चांगला वागेलच असें नाहीं आणि माझ्या मरणाचीच वाट पाहात बसेल, म्हणून मीं दत्तकाचा अजून निर्णय घेतलेला नाहीं." भूदान-यज्ञाविषयीं ते म्हणाले, "मला अजूनसुद्धां दिसतें व वाचतां येतें. मला भूदान-यज्ञाविषयीं व विनोबांचीहि माहिती आहे." पण 'दाना'-विषयीं विचारतां क्षणींच ते चिडून म्हणाले, "तुम्हांला कोण जमीन देतो व तुम्ही ती कशी घेतां बघूं या."

उत्तूर हा गांव बऱ्याचशा ऊर्जितावस्थेंत दिसला. गांवाचीं तरुण मुलें एकत्र आलीं आहेत. त्यांनीं 'साने गुरुजी मित्रमंडळ' स्थापन केलें आहे. ह्या मंडळातर्फे ग्रामसुधारणेसाठीं सामुदायिक शरीरश्रमाचीं कामें केलीं जातात. मंडळानें एक नवीन वाचनालय स्थापन केलें असून, ह्या वर्षी पिण्याच्या पाण्याच्या तलावाची बत्तीस वर्षांनंतर संपूर्ण सफाई केली व तळ्यांत सांचलेला दोनशें गाड्या गाळ काढला.

पिंपळगांवांत पिण्याच्या पाण्यासाठीं साधारण जनतेची आणि त्यांतल्या त्यांत हरिजनांची उन्हाळ्यांत अत्यंत केविलवाणी परिस्थिति आहे. गांवाजवळून वाहणाऱ्या चिकोत्रा नदीचें पाणी फेब्रुवारीच्या शेवटीं संपतें. लोकांना जमिनींत खड्डे खणून चिखल सांठवावा लागतो व नंतर चिखल निवळावयाला लावून पाणी घ्यावें लागतें. एक एक घागर पाण्या-(चिखला!-)साठीं दीड ते दोन तास फुकट जातात व बऱ्याच प्रसंगीं मारामाऱ्या देखील कराव्या लागतात. पोवाडे, म्हारकी वगैरे मनोरंजनाचा कार्यक्रम करणारा तेथील शाहीर हा देखील बऱ्याच प्रमाणांत त्यागी मनुष्य दिसला. पिंपळगांवांत एक वैद्यकीय केंद्र निघावें अशी त्याची सदिच्छा आहे. पण 'ग्रामीण वैद्यकीय केंद्र' चालूं होण्यासाठीं सुरुवातीला गांवातर्फे रु. ४०० भरावे लागतात. नजीकच्या सोळा गांवांत वेगवेगळे कार्यक्रम करून त्या शाहिरानें आजतागायत रु. ३०० जमविले आहेत. आणखी चार एक महिन्यांत आणखी शंभर रुपये जमवून तो पिंपळगांवाला 'ग्रामीण वैद्यकीय केंद्र' देणार.

ग्रामीण वैद्यकीय केंद्रांची योजना मोठी अभिनव असून तिची जन्मकथा मजेदार आहे दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत डॉ. सिम्सन नांवाचा








एक जर्मन ज्यू डॉक्टर हिंदुस्थानांत यूद्धकैदी होता. कोल्हापूर सरकारनें त्याला मागूनघेतलें. कांहीं वेळ तो कोल्हापूरचा 'डायरेक्टर ऑफ हेल्थ' झाला. कोल्हापूर जिल्ह्यामध्यें एकंदर ९०० लहान मोठीं गांवें आहेत. निदान तीन गांवांना एक ह्याप्रमाणें एकंदर ३०० ठिकाणीं तरी 'ग्रामीण वैद्यकीय केंद्रें' निघावीं व खेड्यांतील लोकांना वैद्यकीय मदत मिळावी असा विचार डॉ. सिम्सन्स ह्यांनीं केला. थोडया मुदतीचा 'रूरल सब-डिस्पेन्सरर'चा शिक्षणाचा अभ्यासक्रम त्यांनीं काढला व त्याचा कोर्स चालू केला. प्रवेशाच्या पात्रतेसाठीं शैक्षणीय लायकी व्ह. फा. पर्यंत ठेवली आणि अभ्यासक्रम संपल्यानंतर एक परीक्षा ठेवली. खेडेगांवांत नेहमींच आढळणारे म्हणजे साधा ताप, मलेरिया, आमांश, टायफॉइड वगैरे वीस पंचवीस रोगांची माहिती व त्याचप्रमाणें त्या रोगांवर रामबाण अशीं किनाइन, एण्टेरोव्हायोफार्म, व्हिटॅमिन बी-प्लेक्स अशा औषधांची माहिती त्यांना देण्यांत आली. जेथें जेथें 'ग्रामीण वैद्यकीय केंद्रें' निघालीं तेथें तेथें हीं औषधें व इतर आवश्यक साहित्य सरकारमार्फत पुरविलें गेलें. साधारणपणें ह्या सर्व औषधांची व साहित्याची किंमत केंद्रामागें रु. २०० असते. हीं औषधें गांवांतील रोग्यांना एक आणा नाममात्र फी घेऊन दिलीं जातात. मदत निसांना मासिक मेहेनताना दिला जातो व वेळों-वेळीं औषधाचा पुरवठा केला जातो. दर महिन्याला वेगवेगळ्या औषधांचा व्यय व गांवांतील रोग्यांसंबंधीं माहिती त्यांना सादर करावी लागते.

ग्रामीण वैद्यकीय केंद्रांचा सर्वांत मोठा फायदा म्हणजे सर्वसामान्य रोगांसाठीं तरी गरीब जनतेची चांगलीच सोय झाली आहे. संस्थान विलीन झाल्यावर हीं 'ग्रामीण वैद्यकीय केंद्रें' नाहींशीं व्हावीं म्हणून एक विचार पुढें आला होता. पण हीं चालू असलेलीं केंद्रें नाहींशीं केल्यास असलेली वैद्यकीय मदत संपूर्ण नाहींशी होईल असें दिसलें, म्हणून सध्यां तरी मागीलच योजना चालू आहे. अजूनपर्यंतच्या माझ्या उत्तर अगर दक्षिण हिंदुस्थानांतील प्रवासांत अशा तऱ्हेची अगर ह्याच धर्तीवरची स्वस्त वैद्यकीय मदतयोजना मला फक्त कोल्हापुरांतच आढळली. भारतांतील ही एकमेव अभिनव योजना आहे, असें मला सांगण्यांत आलें. ह्याच्या-पेक्षां थोड्याफार श्रेष्ठ दर्जाची, पण एम्. बी. बी. एस्. वगैरेसारखी भयंकर खर्चाची नव्हे, अशी एखादी अखिल भारतांतील खेड्यांसाठीं वैद्यकीय योजना निर्माण करणें अत्यंत आवश्यक आहे. सध्यांच्या परिस्थितींत खेड्यांतील ही वैद्यकीय मदतयोजना मला फारच आवडली.

तीन हजार लोकसंख्या असलेलें गारगोटी हें गांव आतां मोठें शहर होण्याच्या मार्गावर आहे. ज्या खेडेगांवाचें शहर होण्याचा संभव असतो तेथें महागाई होणें हें प्राथमिक लक्षण आहे. गारगोटींतील घरभाडीं कोल्हापूर शहरांतील घर-भाड्यांपेक्षां देखील कांहीं ठिकाणीं जास्त आढळलीं. दूध, भाजीपाला वगैरे इतर देखील दैनंदिन गरजेच्या गोष्टी बऱ्याच महाग आहेत. गारगोटी-जवळून वेदगंगा नदी वाहते. त्या नदीवर पांच-सहा घाट बांधण्यांत आलेले आहेत त्यामुळें स्नानाची व धुण्याची फारच चांगली सोय झाली आहे. पण हे घाट वेगवेगळ्या जमातींना वांटून दिलेले आहेत असें समजलें. नदीच्या खालच्या बाजुला असलेला घाट हरिजनांसाठीं आहे.

गारगोटी येथें हल्लींच स्थापण्यांत आलेल्या मौनी विद्यापीठाची जागा आल्हाददायक व रमणीय आहे. हें विद्यापीठ गांवाच्या एका बाजूला असलें तरी गांवापासून फार दूर नाहीं. 'मौनी विद्यापीठ' असें नांव कां दिलें असें विचारलें तेव्हां मौनी महाराजांसंबंधीं कांहीं उपयुक्त व अधिकृत अशी माहिती देण्यांत आली. श्री मौनी हे शिवाजीच्या काळांतील संत होते. मौनी हें नांव धारण करण्यापूर्वीं त्यांचें नांव काय होतें हें नक्की सांगता येत नाहीं. ते जातीनें ब्राह्मण नसल्यामुळें त्यांना त्या वेळच्या द्विजश्रेष्ठांनीं त्रास देण्यास सुरुवात केली. ह्या कारणास्तव महाराजांनीं मौन पाळण्यास सुरुवात केली व आयुष्य संपेपर्यंत मौन पाळलें. इतकेंच नव्हे तर स्वतःच्या हातानें अन्न देखील न घेण्याचें व्रत घेतलें. महाराजांचे शिष्य त्यांना अन्न भरवीत असत. श्रीशिवाजी-












महाराज जेव्हां दक्षिणेच्या विजयासाठीं निघाले तेव्हां साहजिकच मौनीमहाराजांचा आशीर्वाद घेण्यासाठीं ते येथें आले. गारगोटी शहराजवळील पाटगांव येथें मौनीमहाराजांचा मठ होता. भेटीच्या प्रसंगीं शिवाजीचे प्रधान मोरोपंत पिंगळे ह्यांनीं त्यांना फुलांचा हार अर्पण केला. शिवाजीनें स्वतःच्या हातानें त्यांना अन्न भरविण्यास सुरुवात केली. घांस भरवीत असतांना 'आपला दक्षिण-दिग्विजय यशस्वी होईल ना ?' असा शिवाजीच्या मनांत विचार आला. शिवाजीनें पाहिलें तों मौनी-महाराज स्मित करीत होते. त्यांच्या मुखाप्रत नेलेला घांस त्यांनीं शिवाजीला आपल्या हातानें प्रसाद म्हणून दिला. (ही माहिती बखर व यदुनाथ सरकार यांच्या पुस्तकाच्या आधारें मिळते.)

गारगोटी येथील प्राथमिक शाळा ह्याच वर्षी विद्यापीठाच्या हातीं आली. आज विद्यापीठाकडे एक प्राथमिक शाळा, एक माध्यमिक शाळा आणि प्रथम वर्षाचे व द्वितीय वर्षाचे ट्रेनिंगचे वर्ग आहेत. १९५३ जून पासून बी. टी. साठीं पुणें विद्यापीठाकडून परवानगी मिळाली आहे. विद्यापीठाच्या मंदिरामध्यें वाचनालय आहे. मंदिराच्या हॉलची जागा मोठी असून व्याख्यानें, कार्यक्रम वगैरे येथेंच घेतात. वाचनालयामध्यें कपाटें असून कपाटांना कुलुपें लावलेलीं नाहींत. आपणाला पाहिजे तें पुस्तक वाचनासाठीं आपण न्यावयाचें व नंतर जागेवर ठेवावयाचें अशी व्यवस्था आहे. सुरुवातीला कांहीं पुस्तकें चोरीस गेलीं. पण मुख्यांनीं असें सांगितलें कीं, "येथें असलेलीं पुस्तकें अत्यावश्यक अशींच आहेत. पुस्तकें चोरीस गेल्यास नवीन पुस्तकें न आणतां चोरीस गेलेलीं पुस्तकेंच परत विकत आणलीं जातील. तुम्हांला जर नवीन माहितीचीं पुस्तकें वाचावयाचीं असतील तर तुम्ही जुनीं पुस्तकें व्यवस्थित ठेवलीं पाहिजेत." दुसऱ्या दिवशीं चोरीस गेलेलीं सर्व पुस्तकें जागेवर आढळलीं !— शाळेंत येतांना दुपारचें जेवण स्वतः बरोबर आणण्याची व सर्वांनीं एकत्र बसून जेवण्याची पद्धत फारच चांगली आहे. स्वतः बरोबर जेवण आणण्याची प्रथम विद्यार्थ्यांना लाज वाटे. पण विद्यापीठाच्या मुख्यांनीं स्वतःचें जेवण बरोबर आणण्याला सुरुवात करून विद्यार्थ्यांतील न्यूनगंड नाहींसा केला. शाळेंत शिपाई नाहींत. सर्व काम सहा विद्यार्थी आपल्या फावल्या वेळांत करतात. शाळेमध्यें 'सुकें बोर्डिंग' (जेथें जेवणखाण सोडून राहण्याची, अभ्यासाची वगैरे व्यवस्था आहे असें) चालविण्याची चालकांची इच्छा सहज सफल होईल असें वाटतें. माझ्या उत्तर हिंदु-स्थानच्या प्रवासांत अशा तऱ्हेनें चालविलेलीं पुष्कळ 'सुकीं छात्रालयें' व्यवस्थितपणें चाल-लेलीं मला आढळलीं. मुलांनीं कांतलेलें व विद्या-र्थ्यांनीं विणलेलें सूत विद्यार्थ्यांना स्वतःसाठीं वापर-ण्यास देण्याचा विचार अत्यंत उचित आहे. विद्यार्थ्यांना स्वतः चांगलें कांतण्याची व उत्तम विणण्याची गोडी उत्पन्न होईल. "पहिल्या प्रसंगीं जमखाने निर्माण होतील पण नंतर तलम खादी निर्माण होईल"—अण्णासाहेब सहस्रबुद्धे म्हणाले—गांवामध्यें बीज नाहीं, पण विद्यापीठा-मध्यें उजेडासाठीं बीज खेळविलेली आहे. सध्यांच्या शिक्षणांत अभावानें तळपणाऱ्या अशा चार कृतींना विद्यापीठामध्यें प्राथमिक महत्त्व दिल्याचें सांगण्यांत आलें. त्या म्हणजे क्रमशः पाहाणें, ऐकणें, बोलणें व शेवटीं लिहिणें ह्या होत. सध्यांच्या शिक्षणांत ह्या गोष्टी आपण उलट्या क्रमानें, अनैसर्गिकपणें करतों.

खेडेगांवांतून सामुदायिकत्याची, सहकार्याची माहिती असलेले चांगले कार्यकर्ते निर्माण करणें व सध्यां त्यांच्यामार्फत जवळील ३० खेड्यांच्या व कांहीं काळानंतर आजूबाजूच्या ९६ खेड्यांच्या जीवनांत नवीन चैतन्य निर्माण करून त्या खेड्यांची भरभराट करणें हें विद्यापीठाचें ध्येय आहे, असें दिसतें. अशा प्रकारच्या ध्येयाचा विचार केला असतांना प्रथम पुढील दहा वर्षांत तरी या शंभर गांवांतील काम करूं शकणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला संपूर्ण काम (full employmeut) देण्याच्या दृष्टीनें एक योजना असणें अत्यावश्यक आहे असें मला वाटतें. त्या दृष्टीनें अजूनपर्यंत विद्यापीठानें विचार केलेला दिसला नाहीं. विद्यापीठाचा जसजसा कारभार वाढेल तसतसें



अनुक्रमणिका






घरें व इमारती बांधण्यासाठीं कांहीं कामगारांची गरज लागेल व थोडे दिवस बेकारी कमी झाल्यासारखी दिसेल. ट्रेनिंगचे व बी. टी.चे विद्यार्थी गांवांतील लोकांबरोबर कशा तऱ्हेची वागणूक ठेवतात हेंहि पाहाणें आवश्यक होईल. विद्यापीठ शंभर गांवांची सर्वांगीण उन्नति करूं शकेल असें वाटत नाहीं. कारण संपूर्ण काम घ्यावयाची योजना विद्यापीठाजवळ नाहीं. गांवांची एकांगी वाढ होईल व दोन वर्ग—विद्यापीठाचा लहानसा उन्नत वर्ग व इतर उरलेला अधोगत वर्ग असे निर्माण होतील अशी भीति वाटते.

सध्यां विद्यापीठाकडे एकून २८ एकर जमीन आहे. विद्यापीठाच्या जागेपैकीं कांहीं जागा हरिजनांनीं आपल्या 'थळोबा'च्या मंदिरासाठीं ठेवली होती. हल्लीं तेथें एक हरिजनांसाठीं लहानसें मंदिर बांधण्यांत आलें आहे. गारगोटी येथील हरिजनांची राहण्याचीं घरें अजूनपर्यंत इतरत्र पाहिलेल्या हरिजनांच्या घरांपेक्षां किती तरी पटींनीं चांगलीं आढळलीं. दहा वर्षांपूर्वीं सर्व हरिजनवाडा हा पूर्णतया जळून गेला होता व सध्यां असलेला हरिजनवाडा हा नवीन बांधलेला हरिजनवाडा आहे असें सांगण्यांत आलें.

भोगावती नदीवर बांधलेला राधानगरीचा तलाव राधानगरी गांवापासून तीन मैल दूर आहे. तलावाच्या पायथ्याशीं वीज उत्पन्न करण्यासाठीं पॉवरहाऊस आहे. तेथें चार टरबाइन्स असून जास्तींत जास्त ६००० किलो वॅट्स् वीज उत्पन्न होण्याची शक्यता आहे. अर्थात्, उन्हाळ्यांत ह्याच्यापेक्षां पुष्कळच कमी वीजनिर्मिति होईल. राधानगरीची वीज कोल्हापूरला गेली आहे, पण मार्गावर असलेल्या राधानगरी शहराला आजहि (४।११।१९५२) वीज पुरवठा नाहीं.

सरबडे ह्या गांवाजवळ 'काळमाची वाडी' आहे. येथें राधानगरीसारखा मोठा तलाव व राधानगरीपेक्षां जास्त प्रमाणांत व कमी खर्चांत वीज निर्मिति शक्य आहे. येथें धरण बांधलें गेल्यास ३२००० एकर जमीन पाण्याखालीं भिजूं शकेल. त्याचप्रमाणें तलावाच्या पाण्याखालीं बुडणारी जमीन निकस व डोंगराळ आहे. ही योजना जर हातांत घेतली, तर आर्थिक दृष्ट्या काटकसरीची ठरेल व राधानगरीपेक्षां जास्त फायदेशीर व कमी खर्चाची आढळेल. सरवडे येथील शाळा कौलानें शाकारलेली आहे. नुकतीच ती बांधून झाली असून तिच्यावरील कौलें काळीं कां या प्रश्नाचें उत्तर महत्त्वपूर्ण आढळलें. बंद भट्टीमध्यें कार्बनायझेशन जास्त होतें. कौलें जास्त व्यवस्थित प्रमाणांत बांधलीं जातात. तेवढ्याच सर्पणानें उघड्या भट्टींत भाजलेलीं कौलें तांबडीं निघतात. उघड्या भट्टींत सुमारें २०% कौलें अर्धीं कच्चीं अगर बिनभाजलेल्या स्थितींतील मिळतात. ह्याउलट, बंद भट्टींत फक्त २% ते ३% च कौलें खराब निघतात. बंद भट्टींतील काळीं कौलें तांबड्या कौलापेक्षां जास्त टिकाऊ असतात.

१९४८ मध्यें जानेवारी महिन्याच्या शेवटीं महात्माजींची हत्या झाल्यावर कोल्हापूर, सातारा, मिरज, सांगली, वगैरे ठिकाणीं जी जाळपोळ झाली तिला 'जळित' ह्या नांवानें संबोधण्यांत येतें. ह्या जाळपोळीची झळ शहरापेक्षां खेड्यांतील लोकांनाच जास्त प्रमाणांत भासली. खुद्द कोल्हापूर शहरांत देखील जाळपोळ बऱ्याच मोठ्या प्रमाणांत झालेली आढळली. आम्हीं ज्या ज्या गांवांना भेटी दिल्या त्यांतील बहुसंख्य गांवांत 'जळित' झालें. अगदीं थोड्या अपवादात्मक गांवांतच गांवकऱ्यांनीं एकत्र येऊन जळित होऊं दिलें नाहीं. अशा गांवांत 'तारळें' गांवाची प्रामुख्यानें गणना करावी लागते. तारळे गांवाप्रमाणेंच इतरत्रहि चार-पांच गांवांत जळित झालें नाहीं.

जळित झालेल्या बऱ्याचशा गांवांमधून मध्यवर्गीय जमात संपूर्णपणें निघून गेलेली असून मोठमोठ्या शहरांत स्थायिक होण्याचा ती प्रयत्न करीत असल्याचें आढळलें. दहा-बारा अपवादात्मक गांवांत जळितामध्यें पोळून निघालेल्या जमातीच्या लोकांनीं सांगितलें कीं, "जळित झालें म्हणून काय झालें? हें गांव ही आमची जन्मभूमि आहे. येथेंच आम्ही लहानाचे मोठे झालों. ही आमची कर्मभूमि आहे. प्रत्येकाच्या हातून चुका होतात. बऱ्याच प्रसंगीं एकाच्या चुकीचा त्रास दुसऱ्याला सहन करावा लागतो.












# कोल्हापूर जिल्ह्याचें ओझरतें सामाजिक दर्शन

आम्ही येथेंच राहणार व येथेंच मरणार !" किती तेजस्वी हें उत्तर आहे !

"ही जमात तुमच्या खेड्यांतून नाहींशी झाल्यामुळें तुम्हांला तुमचा तोटा अगर फायदा झाला असें वाटतें का ?" असा प्रश्न मीं बहुतेक खेड्यांत गांवकऱ्यांना विचारला. वेगवेगळ्या गांवकऱ्यांनीं वेगवेगळीं उत्तरें दिलीं. पुष्कळशा गांवकऱ्यांनीं आपणांतील "शहाणे लोक व प्रखर बुद्धि" नाहींशी झाल्याचें सांगितलें. कांहीं म्हणाले, "ह्यामुळें आम्हांला पूर्वी दिसत नव्हतें तें आतां दिसत आहे. आमच्याच जातीचे लोक आमच्यावर बऱ्याच जास्त प्रमाणांत गुंडगिरी करतात. हा प्रश्न ज्ञातीचा नाहीं, आर्थिक आहे. ब्रिटिशांचें राज्य जाऊन काँग्रेसचें रामराज्य आलें व आमचे हाल वाढले....गेलीं वरीच वर्षें आमच्यांत प्रकर्षानें वाढत असलेल्या ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाचें हें पर्यवसान आहे." फक्त एका गांवांत मला अत्यंत मार्मिक व विचारणीय असें उत्तर मिळालें. हें उत्तर देणारा शेतकरी अत्यंत सुशिक्षित होता व त्याचप्रमाणें त्याचा जागतिक घडामोडींशीं वर्तमानपत्राच्या द्वारें संबंध आहे असें मला दिसलें. तो मला म्हणाला, "आज महाराष्ट्रांतील लोकसंख्या विचारांत घेतल्यास त्यांत मराठे ६५%, हरिजन १८%, ब्राह्मण ३½% व उरलेले इतर सर्व जमातींतील लोक आहेत. ह्या साडेतीन टक्के लोकांत पूर्वीपासून बुद्धि, कार्यतत्परता, प्रसंगावधान, कार्यकुशलता, कार्यप्रारंभाची शक्ति व त्याग हे सहा श्रेष्ठ सद्गुण प्रकर्षानें वास करत होते. पण हल्लींच्या ३०-३५ वर्षांमध्यें त्यांच्यांतील वरील सहाहि गुणांऐवजीं स्वार्थलोलुपता हा एक दुर्गुण भयानक प्रमाणांत वाढला आहे. जसजशी ह्या जमातीची स्वार्थलोलुपता वाढेल तसतशी ही जमात मागें हटत जाणार. गेल्या पसतीस वर्षांत स्वार्थलोलुपतेमुळें ह्या जमातीची नैतिक पातळी पुष्कळच प्रमाणांत खालावलेली आहे. ह्या जमातींत वर वर्णिलेले सहा सद्गुण होते तोंपर्यन्त साडेतीन शहाण्यांचें साडेशहाणपण मूर्खांनीं ऐकलें. सध्यांचे दिवस लोकशाहीचे आहेत. त्यागी माणसांबद्दल आम्हांला जेवढा आदर आहे त्याच्या सहस्रपटीनें स्वार्थलंपट लोकांबद्दल तिरस्कार आहे. मला कधीं कधीं वाटतें कीं, सतत दीडशें दोनशें वर्षें काम केल्यामुळें ही जमात आज दमून भागून थकली (exhausted) आहे. ह्या जमातीनें 'मीच श्रेष्ठ इतर नष्ट' हा मोह सोडावा व कृपा करून इतरांच्या उन्नतीला व प्रगतीला मदत करावी."

मी म्हणालों, "आपल्या बोलण्यांत मला बऱ्याच प्रमाणांत तथ्यांश वाटतो. आपण विजयी व्हा, असा मी आशीर्वाद देतों."

कौलव हा गांव दुसऱ्या एक दृष्टीनें नावीन्यपूर्ण वाटला. कौलव गांवांतील बहुतेक सर्व जमीन तेथील लोकांच्या ताब्यांत आहे. येथें सुमारें सव्वाचारशें खातेदार असून सुमारें सव्वाशें खातेदारांच्या खात्यावर प्रत्येकीं एक एकरापेक्षां कमी जमीन आहे. गरिबीचें प्रमाण इतर गांवांच्या मानानें थोडेसें जास्त आहे.

शिरोली ह्या गांवीं आम्ही सुमारें तासभर थांबलों. गांवामध्यें सरकारतर्फें ठेवलेला रेडिओ-सेट असून तो चालविण्यासाठीं बॅटरीची देखील व्यवस्था आहे. गांवांतील देवळामध्यें 'प्रत्येक गांवाची माहिती देणारा आदर्श तक्ता कसा असावा' तो पाहिला. या तक्त्यांत गांवांतील लोकसंख्या, लोकांची, घरांची, कुटुंबांची संख्या, गांवाची असलेली एकंदर शेतजमीन, खातेदारांची संख्या, पिकांचा तपशील, क्रेडिट सोसायटी, दुकानें, हॉटेलें, वगैरेबद्दल अद्ययावत् अशी आंकडेवार माहिती आहे. थोडीशी दुरुस्ती केल्यास कोणत्याहि गांवाची थोडक्यांत संपूर्ण माहिती देण्याला अडचण पडूं नये असा तो तक्ता वाटला.

कोल्हापूर जिल्ह्यांतील खेडेगांवांचा जेव्हां साकल्यानें विचार करावा तेव्हां असें आढळतें कीं, साधारणपणें प्रत्येक खेडेगांवांत तीन दर्जाचे लोक आढळतात. पहिला दर्जा म्हणजे सधन शेतकरी. ५% कुटुंबें ह्या वर्गामध्यें मोडतात. ह्यांच्याकडे सामान्यतः १०-१२ एकरांपेक्षां जास्त जमिन असते. त्यांपैकीं कांहीं जमीन तो स्वतः कसतो व इतर जमीन कुळांकडे खंडानें तरी असते अगर शेतमजूर लावून पिकें काढलीं जातात. बऱ्याच खेड्यांमध्यें ह्या शेतकऱ्यांच्या

जमिनीला लिफ्ट इरिगेशननें पाणीपुरवठा होतो. अर्थात्, त्यांतील बराचसा भाग ऊस, तमाखू वगैरेसारख्या पैशांच्या पिकां-( cash crops ) चा असतो. सधन असल्यामुळें शेतामध्यें रासायनिक खतें वापरणें, लिफ्ट इरिगेशनसाठीं बैलानें ओढल्या जाणाऱ्या मोटा न वापरतां डीझेल एंजिनें व पंप वापरणें, ( अशीं एंजिनें खुद्द कोल्हापूर जिल्ह्यांत चार ते पांच हजारांपर्यंत आहेत. ) त्याला परवडतें. कांहीं शेतकरी तर आपल्या जमिनीची ट्रॅक्टर्सनें नांगरट करतात. हातांत नेहमींच पैसा असल्यामुळें हा वर्ग भयंकर स्वार्थी बनला आहे व गांवांत भांडणें कशीं होतील व झाल्यास त्यांत आपला फायदा कोठें व कसा होईल यांत जास्त लक्ष देतो. दुसरा दर्जा किंवा वर्ग ५० ते ५५% शेतकरी कुटुंबांचा आहे. साधारणपणें ह्या शेतकऱ्यांजवळ दोन ते चार एकरपर्यंत जमीन असते. हा शेतकरीवर्ग स्वतःची जमीन कसतोच; पण ती जीवनाला अपुरी पडत असल्याकारणानें सधन शेतकऱ्यांकडून अगर शहरांत राहणाऱ्या जमीनदारांकडून जमीन खंडानें घेतो. हा खंड बऱ्याच वेळां उत्पन्नाच्या ½ ते ⅓ इतका असतो. हा वर्ग जीवनाची कशीबशी गुजराण करतो. ह्या दोहोंहून देखील निराळा असा एक तिसरा वर्ग प्रत्येक खेड्यांत प्रामुख्यानें दिसला. त्यांत ३० ते ३२% शेतकरी कुटुंबांचा समावेश होतो. बऱ्याच वेळां ह्यांच्या मालकीची जमीन नसतेच व असल्यास ती पाव एकर अर्धा एकर ह्यांच्या दरम्यान असते. नेहमींच दारिद्र्यांत खितपत पडलेला व काम नसल्यामुळें बेकार असलेल्या ह्या वर्गांतील लोकांची काम करण्याची शक्ति, कामाचा उरक व काम करण्याचा वेग बराच कमी असतो. त्यांच्या स्वतःच्या जमिनीवर वर्षभर पुरेल इतकें ते उत्पन्न करूं शकत नाहींत. म्हणून त्यांना मजुरी करणें भाग पडतें. वर्षांत फार तर त्यांना तीन ते चार महिने काम पडतें व इतर दिवस बेकारी असते. मध्यवर्ती सरकारनें केलेल्या व्याख्येप्रमाणें हा वर्ग 'शेतमजूर' ( landless labour ) ह्या सदरांत मोडतो. आम्ही पाहात होतों कीं, ह्यांना दिवसांतून एक वेळ देखील भरपोटी जेवण मिळणें कठीण जात होतें. सर्व हरिजन ह्या तिसऱ्या वर्गांत मोडतात.

कोल्हापूरमध्यें प्रत्येक गांवांत 'शेरी' ( सरकारची–छत्रपतींची ) जमीन आहे व त्या जमिनीचा दरवर्षी लिलांव होतो. मातब्बर लोक लिलांवाचे पैसे वाढवत असल्यामुळें ते लिलांव घेऊं शकतात; पण गरीब ( दुसऱ्या व तिसऱ्या दर्जाचे शेतकरी ) तो लिलांव घेऊं शकत नाहींत. लिलांव घेतल्यावर हे वार्षिक मालक त्या जमिनीचे लहान-मोठे भाग करून वर्षाकरितां खंडानें देतात व अशा प्रकारें स्वतः श्रम न करतां मधल्यामध्यें बऱ्याच प्रसंगीं शेंकडा ४०० ते ५०० कमिशन खातात.

कोल्हापूर जिल्ह्यामध्यें मीं १९४६ मध्यें प्रथम कांहीं ठिकाणीं पाहिलेली सहकार्याची भावना आज देखील प्रत्येक गांवामध्यें दिसत होती. सामान्य जनता आपल्या गांवांसाठीं कांहींहि मोबदला न घेतां आठवड्यांतील एक दिवस 'शरीरश्रम' देण्याला नेहमींच तयार असते. या श्रमदिनाच्या निमित्तानें रस्ता बांधणें, विहिरी बांधणें, डागडुजी करणें, शाळेची इमारत बांधणें वगैरे कामें चालू असतात. ह्या उत्साहाचाच 'समाज-विकासयोजनें'त सरकारला योग्य उपयोग करून घेतां येईल.

कोल्हापूर जिल्ह्यामधून बऱ्याच लहान-मोठ्या नद्या वाहत आहेत. ह्या नद्यांना ठिकठिकाणीं योग्य बंधारे टाकले तर शेती "हुकमी" बनेल व तिचा जिल्ह्याच्या ऊर्जितावस्थेला उपयोग होईल. पण हें होण्यासाठीं शेतीमध्यें काम करणाऱ्या लोकांना जमिनींत हक्क देणें व गांवांत न राहणाऱ्या लोकांचे गांवांतील शेतजमिनींतील हक्क काढून घेणें ह्या गोष्टी अत्यावश्यक आहेत. ह्या बिन-दुष्काळी जिल्ह्यांत प्रत्येकाच्या अन्नवस्त्राची वरील प्रकारें सोय झाल्यास हा जिल्हा महाराष्ट्रांत स्वयंपूर्ण व भरभराटलेला जिल्हा होण्याला वेळ लागणार नाहीं.

---










# भूदान-यज्ञ : कांहीं विचार

'नवभारता'च्या ऑगस्ट-सेप्टेंबर १९५२ च्या अंकांत मीं 'भूदान-यज्ञा' संबंधीं एक लेख लिहिला होता. त्या लेखावर श्री. शंकरराव देव यांनीं ('नवभारता' च्या नोव्हेंबर १९५२ च्या अंकांत) लेख लिहून माझ्या लेखाचें सहानुभूतिपूर्वक विश्लेषण करून जें कांहीं विवेचन केलें आहे त्या योगानें भूदान आंदोलनाची भूमिका स्पष्ट होण्यास मदतच होईल.

## भूमिहीन मजुरांचा प्रश्न

भूदान-यज्ञासंबंधीं माझें प्रामुख्यानें म्हणणें असें आहे : न्याय आणि समता पायांवर आधारलेल्या समाजरचनेची स्थापना करणें हा जो मुख्य प्रश्न तो सोडविण्याचा एक महान्, अभूतपूर्व प्रयत्न म्हणून भूदान यज्ञाचा प्रयोग मला अत्यंत आदरणीय वाटतो. पण त्याबरोबरच मला असेंहि वाटतें कीं, जमिनीची वांटणी करतांनाहि भूमिहीन कुळें (tenants) आणि भूमिहीन मजूर यांमध्यें आपण फरक करून, जमीन देण्याच्या बाबतींत भूमिहीन कुळांना अग्रहक्क दिला पाहिजे. प्रत्येक भूमिहीन कुटुंबाला जमिनीचा लहान तुकडा द्यावयाचें म्हटलें तर आपल्या ग्रामीण अर्थ-व्यवस्थेचा पायाच डळमळीत होईल, अर्थव्यवस्थेंत विकृति उत्पन्न होऊन समाजांतील व्यवसायांचा समतोलच बिघडून जाईल. अशा विषम व विकृत अर्थव्यवस्थेंत कार्यक्षम (able-bodied) अशा लोकसंख्येपैकीं शेंकडा ९० लोक जमिनीवरच कसाबसा रडतखडत चरितार्थ चालविण्याचा प्रयत्न करतील. अशी परिस्थिति उत्पन्न होणें म्हणजे जमीन आणि लोक या उभयतांवरहि तो एक अनर्थकारक अन्याय होय. आधुनिक समाज म्हटला म्हणजे त्यांत आरोग्य, शिक्षण आणि करमणूक या बाबतींत कांहीं योग्य असें किमान जीवनमान समाजांतील प्रत्येक व्यक्तीला ठेवतां आलें पाहिजे. याशिवाय आधुनिक राज्य चालवायचें म्हणजे सैन्य ठेवणें ही गोष्ट–ती कितीहि वाईट असली तरी–आवश्यक म्हणून आलीच! सैन्याचा खर्च राहूं द्या, आरोग्य शिक्षणादि–कामांकरितां जो खर्च करावा लागेल त्याला लागणारा जादा पैसा वर वर्णन केलेल्या अर्थव्यवस्थेंतून निर्माण होणें अशक्य आहे! म्हणून मीं माझ्या त्या लेखांत अशी सूचना केली होती कीं, प्रत्येक भूमिहीन कुळा-(tenants) ला जमीन द्यायच्या प्रयत्नाबरोबर आपणांस भूमिहीन मजुरालाहि बिन–शेती धंद्याच्या–विशेषतः ग्रामोद्योगाच्या द्वारें काम देतां आलें पाहिजे.

## विचार आणि प्रत्यक्ष आचार

श्री. शंकरराव देव यांनीं आपल्या लेखांत सेवापुरी येथील ठरावाकडे माझें लक्ष वेधलें असून, त्या ठरावांत ग्रामोद्योगावरहि सारखाच भर दिला आहे असें त्यांनीं दाखविलें आहे. त्यानंतर त्यांनीं जें विधान केलें आहे तें मात्र फार विस्मयकारक आहे. ते म्हणतात : "ठरावाच्या या भागाकडे लोकांचें व कार्यकर्त्यांचें जितकें लक्ष जावयास पाहिजे तितकें अद्याप गेलें नसलें तर तो ठराव करणारांचा दोष नाहीं." कोणत्याहि चळवळीला, तिचें ध्येय व उद्दिष्टें ज्यांत समाविष्ट झालीं आहेत, असा ठराव हा असतोच. अशा या शाब्दिक ठरावा-वरूनच चळवळीचें मूल्यमापन करावयाचें म्हटलें, तर कोणत्याहि चळवळीवर टीका करायलाच नको! सेवापुरीचा ठराव करणारे प्रामाणिक नाहींत किंवा त्यांच्या मनांत एक आणि ठरावांत

---

'नवभारत'करितां मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे.—का. सं.

एक आहे असें मला सुचवावयाचें नाहीं. परंतु जें कांहीं कार्य होत आहे त्याचें मूल्यमापन करणाऱ्या लोकांना "आमचा उद्देश काय आहे हें बघून मूल्यमापन करा" असें सांगणें हें अन्यायाचें आहे. कोणत्याहि सरकारच्या राज्य-घटनेंत मूलभूत हक्कांचीं कांहीं कलमें असतातच. केवळ त्या कलमांवरूनच राज्यकारभाराचें मूल्य-मापन करूं म्हटलें, तर कोणत्याहि सरकारला नांवें ठेवावयास जागाच उरणार नाहीं. मुद्द्याची गोष्ट अशी कीं, अमक्या योजनेचीं उद्दिष्टें केवळ तीं कागदावर कशीं उतरलीं आहेत हें न पाहतां, तीं प्रत्यक्षांत उतरविण्यास प्रत्यक्ष काय केलें जात आहे हेंच पाहिलें पाहिजे.

आज प्रत्येकजण मोठ्या तावातावानें ग्रामो-द्योगाची महती गात असतो. पण त्याचा सर्व उत्साह केवळ ठरावांतच विरून जातो. त्या ठरावांची प्रत्यक्ष अंमलबजावणी कशी करायची या मुख्य प्रश्नाला कोणीच तोंड देत नाहीं. असें व्हायला इतरांना या ना त्या अशा कांहीं सबबी तरी असतील, पण सर्वोदय कार्यकर्त्यांना कोणतीच सबब नाहीं. ग्रामोद्योग-संघाच्या मागें एवढी गांधीजींची पुण्याई उभी असतांना, त्या संघाचें प्रत्यक्ष कार्य बघितलें तर तें विशेष आशादायक आहे असें वाटत नाहीं. भूदानाच्या आश्चर्यकारक आंदोलनाबरोबर जर ग्रामोद्योगांचेंहि आश्चर्य प्रत्यक्षांत उतरूं शकलें तर, गांधीजींचें जीवनकार्य सफल झाल्या-सारखें होईल.

## अनुकूल सामाजिक परिस्थिति कोणती ?

जें माझें ग्रामोद्योगांबद्दल म्हणणें आहे तेंच सहकारी संस्थां-( Co-operatives )-बद्दलहि आहे. प्रत्येकजण—नियोजन-समिति, समाजवादी, सर्वोदयवादी सर्वचजण सहकारी संस्थांची आवश्यकता मान्य करतात. बिन-शेती उद्योग म्हणजेच ग्रामोद्योग आणि शेतकऱ्यांच्या सहकारी संस्था ह्या दोन्हीहि आजच्या अगदीं निकडीच्या गरजा आहेत; मालकीची जमीन किती असावी किंवा जमिनीची फेरवांटणी कशी व्हावी हे जितके आज निकडीचे प्रश्न आहेत, तितकेच निकडीचे प्रश्न ग्रामोद्योग आणि सहकारी संस्था हे होत. वास्तविक दोन्हीहि गोष्टी परस्परांना पूरक आहेत; एकीची अंमलबजावणी केल्याशिवाय दुसरी यशस्वी होणार नाहीं, इतक्या त्या परस्परपूरक आहेत. म्हणूनच माझा त्याविषयीं इतका आग्रह आहे. सर्वोदय विचार हा अपूर्ण आहे किंवा व्यापक नाहीं, असें माझें म्हणणें नाहीं. माझी टीका मुख्य सर्वोदय-विचाराच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीवर आहे. आज ती अंमलबजावणी अगदीं एकदेशीय ( lop-sided ) आहे. टीका करावी असा अर्थात् माझा उद्देश नाहीं. टीका करायचा माझा अधिकारहि नाहीं. माझा उद्देश एवढाच कीं, सध्यांच्या सर्वोदय-वाद्यांच्या प्रत्यक्ष कृतींत कांहीं बदल व्हावा. तसा जर झाला तरच त्यांचें सामाजिक आवाहन अर्थ-पूर्ण होऊन, त्याचें परिणामकारित्व वाढेल. सर्वोदयी ध्येय सफल व्हायचें असेल तर पुढीलप्रमाणें अनुकूल सामाजिक परिस्थिति ( social set-up ) घडवून आणली पाहिजे : ( १ ) जमीनीची फेर-वांटणी होऊन जमीनमालकीचे वांटप न्याय्य झालें पाहिजे. ( २ ) जमिनीची फेरवांटणी होऊनहि ज्यांच्या वांट्याला जमीन पुरेशी मिळाली नाहीं अशांनीं- म्हणजे उदरनिर्वाह न भागणाऱ्या अशा शेतकऱ्यां-( uneconomic farmers )-नीं सहकारी शेती केली पाहिजे. ( ३ ) शेतीच्या मागसलेल्या तंत्रामुळें व समाजाच्या उपेक्षेमुळें ज्यांना इतर कामधंदा कोणताच उपलब्ध होत नाहीं व म्हणून ज्यांना जमिनीवर मजूर म्हणून राबावें लागत आहे, त्यांना ग्रामोद्योग उपलब्ध करून दिले पाहिजेत. ( ४ ) वरील तिन्हीहि कार्यक्रम बरोबरच अंमलांत आणले गेले पाहिजेत.—श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं 'साधनें'त लिहिलेल्या लेखांत म्हटलें आहे कीं, "जमिनीचे फार लहान तुकडे झालेलेच आहेत. ते ही ( भूदान ) चळवळ झाल्यास आणखी वाढतील." हेच शब्द श्री. शंकरराव देवांनीं आपल्या लेखांत उद्धृत केलेले आहेत. या उपरिनिर्दिष्ट चारहि गोष्टी घडून आल्या तर मला खात्री आहे कीं, श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं हा जो निराशेचा सूर काढला आहे, त्याला कारण उरणार नाहीं. शेवटीं माझ्या पूर्वीच्या म्हणण्याचाच मला पुनरुच्चार








करावयाचा आहे कीं, बेकारीवर उपाय म्हणजे समाजाला उपयुक्त अशा कामधंद्यांची वाढ करणें हा होय; आहे तेंच काम वांटून देणें नव्हे.

### सर्वोदयवादी व समाजवादी–मूलभूत ऐक्य

अलीकडे आचार्य विनोबांनीं भूदानाबरोबर संपत्तिदानाचीहि सांगड घातलेली आहे. शिवाय, भूदान स्वीकारतांना विनोबांनीं अशीहि अट घातली आहे कीं, 'मोठ्या जमीनदारांकडून मिळालेलें भूदान त्यांच्या एकंदर जमिनीशीं जर योग्य प्रमाणांत ($\frac{1}{6}$) असेल तरच तें मी स्वीकारीन.' या दोन्हीहि घटना माझ्या दृष्टीनें अत्यंत समाधानकारक अशा आहेत. माझ्या पूर्वी ('नवभारत' ऑगस्ट-सप्टेंबर १९५२) च्या लेखांत मीं भूदानासंबंधीं आक्षेप असा घेतला होता कीं, या भूदानामुळें समाजांतील विषमता विशेष कमी होईल असें वाटत नाहीं. पण या उपरिनिर्दिष्ट दोन घटनांमुळें तो आक्षेप मी आतां परत घेतों. खरा सर्वोदयवादी आणि खरा समाजवादी यांच्यामध्यें परिस्थितीचें निदान करण्यांत तात्त्विक फरक कांहींहि असोत, परंतु प्रत्यक्ष परिस्थितीला तोंड देतांना सर्वोदयवादी व समाजवादी दोघेहि परिस्थितीला सारख्याच प्रकारें तोंड देऊन साधारण सारखीच उपाययोजना करीत असतात, अशी माझी श्रद्धा आहे. त्यामुळें दोघेहि शेवटीं एक होतील अशी मला आशा आहे. सर्वोदयवादी व समाजवादी या दोन्हीहि गटांमध्यें असलेल्या माझ्या मित्रांना परस्परांमध्यें असलेल्या भिन्न दृष्टिकोनाबद्दल चिंता वाटत असली, तरी मला मात्र फार पूर्वीपासूनच असें वाटत आलें आहे कीं, दोन्हीहि गटांच्या जीवन मूल्यांमध्यें मूलभूत ऐक्यच आहे. त्यांच्यांतील मतभिन्नतेवर विशेष भर न देतां सांगावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, सर्वोदयवादी हा मानवतावादी असून, परंपरेमध्यें जें कांहीं उत्कृष्ट असेल तें जतन करण्याकडे त्याचा कटाक्ष आहे. त्या उलट, समाजवादी हा साधारणपणें बुद्धिवादी असून, त्याचा कटाक्ष जगाच्या इतिहासापासून शिकण्याकडे आहे. सत्याचें दर्शन एकाच बाजूकडून होतें असें नाहीं; तें अनेक बाजूंनीं होत असतें असें दोघांनींहि मान्य केलें पाहिजे. अर्थात् सत्यसंशोधनाची इच्छा व सत्याचा आग्रह मात्र पाहिजे.

---

## होणार न मी साधन !

–१–

स्वजनांशीं युद्ध करूं ?
होउं कसा मी वैरी ?
फिरवीं रे वेगानें
रथ माझा माघारीं
कारुण्यें गद्‌गद हा
झालेला वीर गडी
सिद्ध नसे गाडाया
स्वजनांना रणकुंडीं
  'टाकुनिया बंधुभाव
  लढणें हा तव स्वभाव'
फसलों या शब्दांनीं
सुरु झालें मग कंदन
मानवता एकांतीं
आरंभी आक्रंदन !

–२–

आमिष अन् भीतीचें
टाकुनिया जीर्णतंत्र
तूं प्रचारयंत्रावर
लिहिला जरि शांतिमंत्र
बाहुद्वय उभवुनिया
करिशी जरि पाचारण
साध्य तुझें साधाया
होणार न मी साधन
  शिकवुं नको मज स्वधर्म
  ज्ञात असे विहित कर्म
आकळलें विश्वरूप
उलगडलें तत्त्व गूढ
नष्टस्मृति नाहीं मी
नाहीं वा मोहमूढ !

—गो. म. कुलकर्णी








डॉ. शं. गो. तुळपुळे

# यादवकालीन महाराष्ट्राचें महानुभावीय दर्शन : ५ :

[ शके १२०० च्या आगेंमागें रचिलें गेलेलें ' लीळाचरित्र ' आणि ' गोविंदप्रभुचरित्र ' हे जे दोन महानुभावीय ग्रंथ, त्यांमधून यादवकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या विविध अंगांचें दर्शन घडून त्या समाजाच्या स्थितिगतीची कांहीं कल्पना करतां येते. त्या दृष्टीनें प्रस्तुत लेखमालेंतून लेखकानें या दोन महानुभावीय ग्रंथांच्या आधारें यादवकालीन महाराष्ट्राची सामाजिक पाहणी करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुत लेखांक हा ह्या लेखमालेंतील शेवटचा आहे. या लेखमालेंतील पहिले चार लेखांक अनुक्रमें ' **नवभारता** 'च्या जून ( १९५१ ), जुलै ( १९५१ ), एप्रिल ( १९५२ ) व फेब्रुवारी ( १९५३ ) या अंकांतून आले आहेत. त्यांतून जातिभेद, विटाळ, सामाजिक सुरक्षितता, अधिकार व अधिकारी, गुन्हे व शिक्षा, शेती व शेतकरी, व्यापार व व्यापारी, उद्योगधंदे, नाणीं, सण व सोहळे, स्त्रीजीवन, कलाकौशल्य, शिक्षण, खेळ, चालीरीती इत्यादीविषयीं तत्कालीन उल्लेखांचा विचार केला आहे. ]

## खाद्यपदार्थ

चक्रधर व गोविंदप्रभु यांचीं म्हाइंभटानें लिहिलेलीं चरित्रें म्हणजे यादवकालांतील खाद्यपदार्थांची एक तपशीलवार नोंदच वाटावी इतके नानाविध खाद्यांचे उल्लेख प्रस्तुत ग्रंथांतून आढळतात. चक्रधर चवीनें जेवणारे व गोविंदप्रभु खादाड असल्यानें त्यांच्या आठवणींत नाना प्रकारचे खाद्यपदार्थ व ते तयार करण्याच्या कृती यांचीं वर्णनें आढळावीं यांत आश्चर्यहि नाहीं. पैकीं खाद्यवस्तूंचा परिचय प्रथम करून घेऊं. यादवकालीन वऱ्हाडांत ' पाणीभात ' म्हणजे पाणी असलेला, पातळ पेजेसारखा भात हें एक सिद्धान्न असावें असें पाणीभाताच्या अनेक उल्लेखांवरून वाटतें ( ए. ६४, ७५, ७६; पू. १, २; उ. २८९ ). हा पाणीभात डेऱ्यांतून ठेवीत ( उ. ४२ ) व त्याच्या मुदा करून तो खात ( उ. १३२ ). अर्थात् पाणीभाताबरोबर दुसरें कांहीं तोंडीं लावणें लागत नसावें. ताकभात ( ए. ७ ) व दहींभात, आंबीलभात आणि वरणभात ( पू. २९७ ) या भात खाण्याच्या इतर प्रकारांचीहि नोंद अधूनमधून आढळते. दहीभाताबरोबर आलें असल्यास जेवणास निराळीच रुचि येई ( उ. २५७ ). सोनसाळ तांदुळाचा भात उत्तम प्रतीचा मानला जाई, तर राळांदुळांचा भात गरीबगुरीब खात ( गो. ३० ) व तो एकादशीच्या रात्रीं निराहारासहि चाले ( उ. २११ ). खावरभात व धानाचा भात यांचे उल्लेख अनुक्रमें पूर्वार्ध ( १७ ) व उत्तरार्ध ( २८६ ) यांत आढळतात. पक्वान्नांचा विचार करतां दूधमांडे ( उ. ९९ ), मांडेपुऱ्या ( उ. ३३०; गो. २७९ ), सोजीचे लाडू ( उ. २७१ ), सोजीच्या पोळ्या ( गो. १४६ ), शेवया, सरवळे यांसारखे वळिवट म्हणजे वळलेले पदार्थ ( पू. १५३, १९३ ), गुळमिरियाच्या पोळ्या ( उ. १७५ ), सेवेच्या चुराचे लाडू ( उ. १९२ ) तिळोवे ( गो. ५०; पू. १९३ ) तांदुळाची ' रसांतु ' खीर ( गो. २८२ ), गुळमिरियाच्या आंगारिका ( पू. १५३ ), घारिया म्हणजे घारगे ( पू. १९३ ), दिवे, मुठिये व मुद्रा आणि ' खीच पांतिया ' ( उ. ४३६; गो. १८७ ), अमृतफळें ( पू. १९३, उ. ३२८; गो. ८९ ), खीचपुरिया ( गो. १३४ ), ' वडेमांडे, घारिया-पुरिया, उंबरे, फेण्या, साखरमांडे ' ( गो. २४६ ) इत्यादि पक्वान्नांचे उल्लेख आढळतात. वरीलपैकीं पुष्कळशीं पक्वान्नें तुपांत तयार केलेलीं असूनहि शिवाय तीं तुपाबरोबर खाण्याची प्रथा असलेली दिसून येते. या दृष्टीनें पाहतां तूपसुकेळीं ( गो. २०० ), तूप-धिरडीं ( गो. १५६ ), तूप-पुऱ्या ( उ. १८ ), तूप-लाडू ( उ. २९१ ) यांचे उल्लेख मनोरंजक वाटतील. एकदरींत तुपाची म्हणजे दूधदुभत्याची रेलचेल असावी असें लेइगोईच्या घरीं तुपाच्या घागरी सांडेतों भरून वहात ( उ. ४३ ) व गोविंदप्रभूनें केलेल्या रुक्मिणी-विवाहनाटकसमयीं अक्षरशः तुपाचें








पाट वाहिले ( गो. २२४ )-या दोन आठवणींवरून वाटतें. असो. इतर पदार्थांपैकीं धिरडें हें विशेष लोकप्रिय असावें. त्यांतहि पुनः फुलसोजीचें धिरडें ( पू. ३६८ ), लांकाचें धिरडें ( पू. ३६३ ), चण्याच्या पिठाचें धिरडें ( पू. २१३ ), व जोंधळ्याचें धिरडें ( पू. ३६३ ) इतके प्रकार दिसतात. या धिरड्यांसच गंगातीरीं ' ढीडरें ' तर वऱ्हाडांत ' आहिता ' असें म्हणत ( पू. ३६८ ). एसोले हा पदार्थहि धिरड्याच्या जवळचा दिसतो ( पू. ३६३ ). धिरड्याप्रमाणें राळेयाची धापटी ( उ. २३३ ), चण्याच्या घुगऱ्या ( उ. २३६ ), उतत्या ( उ. ३६२ ), ढोंबरा ( उ. ४५६ ), चण्याचें गणंग ( उ. ६ ), उडदाचे व आंबीचे वडे ( पू. २३८,३०५), लांकाचा थापडा ( पू.२९५), लांकाची भाकरी ( गो. २९ ), दहीं-करंबा ( पू. ३१६ ), बुडडीं म्हणजे भजीं ( पू. २९५ ), चण्याचें ढाकाणें ( उ. २९२ ), जोंधळ्याचा घाटा ( उ. ४०५ ), रातेंवडा ( गो. ५१ ), ढोंबऱ्याचा घाटा ( गो. २७६ ), तुरीच्या पोपटीचे सोले ( गो. २४२ ), ताक-आंबील ( गो. २४५, २९६ ), जोंधळ्याचीं ठेंदरीं ( गो. १५० ), खाजीं ( ए. ६७ ) इत्यादि पदार्थांचे उल्लेख आढळतात. तळींव, सांबारें, खांडीव व रायतें हें पदार्थ तोंडीं लावणें म्हणून खात असें एक लीळा सांगते ( गो. १८० ). वरण जसें चण्याचें ( गो. ३१३ ), तसेंच वालाचें ( गो. ३१८ ) व चवळीचेंहि करीत ( गो. २०१ ). जेवतांना हिरवें डांगर खाण्याचीहि प्रथा असलेली दिसते ( गो. ३१३ ). विवाहादि प्रसंगीं होणाऱ्या जेवणावळींतून वडे, मांडे, वळिवट, पुऱ्या, घारिया इत्यादि पक्वान्नांची रेलचेल असून अशा समयीं भाकरीसारखा साधा पदार्थ मागणें किंवा वाढणें कमीपणाचें समजलें जाई ( गो. २२४ ). रोट्या किंवा पोळ्या जशा सोनसळ्या गव्हाच्या तशा खपल्या गव्हाच्याहि करीत ( गो. २९०, पू. ५४ ). पोळीशीं कांहीं गोड म्हणून मध ( गो. ३१८ ) व गुळाच्या भेली म्हणजे लहान लहान खडे ( गो. ७९ ) खाण्याची पद्धति होती असें दिसतें. साखरेचा सुकाळ असावा असें घरांतून साखरेचे डेरे भरलेले असत त्यावरून वाटतें ( गो. १२३ ). साखरगूळ म्हणजे साखरेसारखा लागणारा गूळ उल्लेखनीय आहे ( उ. २२९ ). चारोळ्या, गोडंब्या, उतत्यांचें कूट, खोबऱ्याचे तुकडे, गूळ व साखर इतक्या वस्तू एकत्र करून बनविलेलें ' खाजें ' म्हणजे खिसमिससारखें खाद्यहि उल्लेखनीय वाटतें ( गो. ३०४ ). चारोळ्या, गोडंब्या व साखर यांचें मिश्रण लाडू किंवा तिळोवे यांच्या चुन्यांत घालून खाण्याचीहि प्रथा असावी असें दिसतें ( गो ५० ). श्वेत उपाहाराची कल्पना मोठी मार्मिक आहे. या प्रकारच्या उपाहारांत सर्व पदार्थ श्वेत वर्णाचे असत व त्यांत तांदुळाचा भात, तांदुळाची खीर, खांडवीं, अमृतफळें, घारिया, दहींवडे, मांडे, साखरलाडू, तिळवे, कालवण, दूध, दहीं इत्यादि श्वेतवर्ण पदार्थांचा समावेश होई ( उ. १२३, गो. २७१ ). पक्वान्नांच्या जेवणास महा-उपाहार म्हणत व त्यांत तुपाचा उपयोग सढळ हातानें होत असे ( गो. १७८ ). केवळ दुधाच्या पक्वान्नांचा उल्लेख उत्तरार्धांतील वामदेवाच्या वृत्तांतांत आढळतो ( उ. २९७ ).

भाज्यांचा विचार करतां पाणीभाताबरोबर वाबुळशेंगा खाण्याचा प्रघात दिसून येतो ( ए. ७५; पू. ९६ ). पालेभाज्यांपैकीं तांदुळजा ( उ. ७६ ), ताकवदु म्हणजे चाकवत ( उ. ८७ ) व आळकवसा ( गो. २२१ ) या तीन भाज्यांचे उल्लेख आढळतात. पैकीं आळकवसा म्हणजे तरवट्याची भाजी असा खुलासा म्हाईंभटानें केला असून ती उकडून प्रथम तिचें पाणी पिळून काढून टाकीत व मग हिंगाची फोडणी देऊन ती शिजवीत असें दिसतें. सोलयाची म्हणजे ओल्या हरबऱ्याची पत्रशाक ( गो. २८२ ) व गाजराची पत्रशाक ( गो. ३१३ ) याहि वास्तविक पालेभाज्यांतच मोडत असून त्यांतील पहिली द्राविड देशांत अधिक रूढ असावी असें दिसतें. फळभाज्यांपैकीं वांग्याची जशी देठांसहित भाजी करीत ( उ. १०७,२७९ ), तसेंच हिंग-मिऱ्यांची फोडणी देऊन वांग्याचें सांबारेंहि रांधीत ( गो. २२२ ). उळिकांदे म्हणजे कांद्याची पात एका ठिकाणीं उल्लेखिलेली आढळते






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( पू. ६२ ). हिरव्या चिंचा निखाऱ्यांचें झगरें घालून त्यावर भाजून खात ( उ. २२१ ). उत्तरार्धांतच एका ठिकाणीं पाणीभाताबरोबर तोंडीं लावणें म्हणून आंबटीभाजीचा उल्लेख आला आहे ( उ. २८९ ). वरील भाज्या एक तर तेल, हिंग व मिरें यांची फोडणी देऊन शिजवून, किंवा ' पीठें ' करून म्हणजे पीठ लावून अशा दोन प्रकारांनीं करीत असें एका लीळेवरून दिसतें ( २२६ ). उसळींपैकीं डाळिंब्या ( ४८४ ) व चण्याचीं कडपें झोडून भाजलेला उळा म्हणजे हरभरा ( उ. १३ ) यांचे निर्देश आढळतात. आंब्याच्या फोडी मीठ-मोहरींत घालून त्यांचें लोणचें करून तें या वर्षीचें पुढील वर्षी खाण्याची रीत असावी ( पू. २३२ ). जोंधळ्याचा हुरडा भाजून त्यांत साखर घालून तो खात ( पू. ३७४ ). हुरडा, हरबऱ्याचे सोले व उसाच्या कांड्या यांचा निर्देश एकांकांतहि एका ठिकाणीं येतो ( ए. २१ ). गुऱ्हाळांत जाऊन तीळ व काकवी एकत्र करून खाण्याची प्रथा असावी असें गोविंदप्रभूंच्या एका लीळेवरून वाटतें ( गो. २३९ ).

कांहीं खाद्य पदार्थ तयार करण्याच्या कृतीहि लीळाचरित्रांत अधूनमधून आढळतात. पैकीं पाणीभात तयार करण्याची कृति पूर्वार्धांत आली आहे. शिजविलेला भात प्रथम पाण्यानें धुवून एका मडक्यांत पाणी घालून त्याचें तोंड बांधून त्यांत ठेवावा व दुसऱ्या दिवशीं सकाळीं पाणी निथळूं देऊन खालीं उरलेला भात पाणीभात म्हणून द्यावा अशी ही कृति आहे ( पू. ३६२ ). मध्यप्रांतांतील गोंड लोकांत वेळूचें कांड कोरून त्यांत तांदूळ कसे शिजवीत तें स्वतः चक्रधरांनीं एका ठिकाणीं सांगितलें आहे ( ए. २२. ) डाळीच्या पिठाचें धिरडें करण्याची कृतिहि वाचनीय आहे. एकदां गोविंदप्रभूंनें धिरड्याचा हट्ट घेतला. तेव्हां महदायिसेनें " फुलसोजी होती : ते दुधांतु कालविली : आंतु साखर घातली : भिडेयास (तव्यावर) तुपाचा बोळा दीधला : वरि ( धिरडें ) शंखाकृति लिंगाकृति घातलें : वरि एळां मिरियां लवंगाची पुडी घातली : " याप्रमाणें हें धिरडें सिद्ध झालें ( पू. ३६८; गो. ८८ ). लाडूसाठीं गूळ, गहूं, मिरे व तेल इतके पदार्थ लागत. प्रथम गव्हाची सोजी काढून त्या सोजीची सेव वळावी व ती सेव तळून गुळाच्या पाकांत घालून त्या मिश्रणाचे लाडू ' बांधावे ' अशी लाडू तयार करण्याची कृति एल्हाइसेच्या आठवणीवरून कळतें ( पू. २१०, २८० ). मांडे हे मांचळीसारख्या एखाद्या उच्चासनावर बसून करण्याची पद्धति असावी असें एका लीळेवरून वाटतें ( गो. २७९ ). ताकवडु म्हणजे चाकवताची भाजी तेलांत कशी करावी हें उत्तरार्धांतील एका लीळेवरून कळतें ( उ. ८७ ). तूप कढवून झाल्यावर तें कांबळ्यांतून गाळीत असें दिसतें ( गो. ८९ ).

### भोजनरीत

यादवकालीन महाराष्ट्रांत जेवणासाठीं ताट व ' ठाय ' म्हणजे पान या दोहोंचाहि उपयोग करीत. त्यांतहि चक्रधरांसारख्या श्रेष्ठ व्यक्तीसाठीं ताट व सर्वसामान्य लोकांसाठीं पानें असा भेद असल्याचें दिसून येतें. ' गोसावियासि ताट केलें : भक्तजनां ठाय केलें ' अशा प्रकारचे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात ( पू. २६२ ). एका लीळेंत पत्रावळींचाहि उल्लेख येतो ( गो. २७९ ). गोविंदप्रभूंसारख्या श्रेष्ठास कधीं पानावर जेवण्याचा प्रसंग आला, तर तें पान वोडवण्यावर म्हणजे पाटावर ठेवीत असें दिसतें ( गो. ३७ ). साधारण जेवण्याचा थाट म्हटला कीं, ताट किंवा ठाय, तें ठेवण्यास अडणी व जवळ ठाणवै म्हणजे समई याप्रमाणें असे ( गो. २०७, पू. २४८; उ. ४७१ ). मोठी पंगत असेल, तर गोविंदप्रभूसारख्या श्रेष्ठाचें ताट ' सीरीं ' म्हणजे अग्रभागीं मांडून इतरांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें खालच्या बाजूस पानें किंवा पत्रावळी मांडीत व यजमानानें ' अनुज्ञा ' दिल्यावरच भोजनास प्रारंभ होई ( गो. २७९ ). तत्पूर्वी सारेजण आपोशन किंवा आपोष्णी घेत व तें घेतांना ' पहीत ' किंवा तूप वाढलेलें नसल्यास त्यासाठीं थांबून बसत ( उ. १४४; पू. १७; गो. २९३ ). भोजनोत्तर आंचवणीं झाल्यावर सर्वांना कधीं ' फोडी ' म्हणजे सुपारीचीं खांडें, तर कधीं लवंगा-जायफळीची मुखशुद्धि देत व त्यानंतर










विडे होऊन भोजनप्रकारंभ संपे ( गो. २७९ ). मुखशुद्धि म्हणून कापूर खाण्याचीहि प्रथा असलेली दिसते ( गो. २६९ ). एकदां गोविंदप्रभूस ' कापुराची प्रवृत्ति ' झाली असतां रिधपुरांत तो मिळत नसल्यानें ' उदय–भास्कर ' नांवाचा कापूर आणण्यासाठीं म्हणून नागदेव व म्हाइंभट हे कटक-देवगिरीस गेल्याची हकीगत आढळते ( गो. २९३ ). विड्यांत देवविडा व सामान्यविडा असे दोन प्रकार दिसतात ( पू. ३१८ ). चेंची किंवा ' पुडुआट्टवा ' अनेकदां उल्लेखिला जातो. असो. ही झाली थाटाच्या जेवणाची रीत. गरीबगुरीब ' दुधीकरव्यां 'त म्हणजे वाळलेल्या दुध्या भोपळ्याचें पात्र करून त्यांतहि जेवीत ( पू. १, २ ). चक्रधरांच्या शिष्यांनीं तर जेवणासाठीं म्हणून पाषाणाच्या तळ्या करूनच ठेविलेल्या होत्या ( उ. ८७ ). श्रीमंतांच्या घरीं तांब्याचीं भांडीं असलीं तरी सर्वसामान्यांच्या घरांतून मडक्यांच्याच उतरंडी असत व अन्नहि मडक्यांतूनच वाढलें जाई ( पू. ३३२;गो. २७८ ). उपाहार एका गांवाहून दुसऱ्या गांवीं नेणें असेल तर कधीं तो गाड्यांतून ( उ. ११ ) तर कधीं कावडींतून नेला जाई ( उ. ११२ ). कांहीं गांवांतून अन्नछत्रें असत व त्यांत भात मिळे ( उ. ८१ ). भिक्षान्नांत आंबीलभात, भाकरी, लोणचें, कोरके म्हणजे तुकडे, साकवती म्हणजे भाजी, वरण, दिवसी यासारखे पदार्थ येत व भिक्षा सर्वत्र मिळे ( पू. ३५३ ). प्रसंगीं ' गोपाळ-भोजनें ' म्हणजे ' वनभोजनें ' होत व शेतांतील कोवळी कोथिंबीर चण्यांत घोळून सारेजण मिळून आवडीनें खात. ( पू. ३५४ ). शतभोजनें व सहस्रभोजनें होत असावीं असें उत्तरार्धांतील एका लीळेवरून वाटतें ( उ. २९२ ). जेवतांना आग्रह करण्याची चालहि फार जुनी दिसते. एकदां साधेचें जेवण झाल्यावर तिच्या पोटांत जागा आहे किंवा नाहीं हें बोटानें पाहून स्वतः चक्रधरांनीं तिला ' लव घेया ' असें म्हणत थोडा दहीभात आग्रहानें वाढला आहे ( उ. २८३ ). नागदेवास तर एक घासहि अधिक घेण्याची इच्छा नसतांना ' हें भीक्षुक कीं : जेविलेयावरि जेवावें ऐसी भाष कीं ' असें म्हणून चक्रधरांनीं त्यास पुनः जेवण्याचा खूप आग्रह करून तो कांहीं केल्यानें ऐकेना, तेव्हां हातांतील चवरीच्या दांड्यानें त्याच्या डोक्यावर ' कसकरि ' मारून त्यास शिक्षा केल्याचें म्हाइंभट सांगतो ( उ. १२३ ). यावरून भिक्षुकांनीं लागोपाठ दोनदां जेवण्यास कांहीं हरकत नाहीं ही कल्पना सातशें वर्षांपूर्वीहि रूढ असलेली दिसते.

## वस्त्रें, पात्रें

प्रस्तुत चरित्रग्रंथांतून यादवकालांतील नानाविध वस्त्रप्रावर्णांचें ज्ञान होऊं शकतें. पैकीं पुरुषांच्या वस्त्रांचा विचार करतां ' उतरीएं ' म्हणजे उत्तरीय (ए. ७; पू. ५५), 'धुवट साउला' म्हणजे रेशमी वस्त्र ( ए. ११; गो. ३५, ९१, १५५ ), पाटसुताचा जोगवटा ( ए. १५ ), धोत्र ( उ. १२७ ), पाटाउदुटी ( गो. ९७ ), 'पडवा' म्हणजे महावस्त्र ( उ. ३४१ ), फुटा ( पू. २७० ), आंगी–टोपरें ( ए. ७२; उ ३७२ ), बाहिरवास ( पू. ६७ ) इत्यादि प्रकार आढळतात. ' सोरटी जाडी ' ची म्हणजे सौराष्ट्रांतील विणीची ' आंगी ' विशेष लोकप्रिय दिसते ( उ. १४३ ). अंथरण्यास दाभणानें विणलेली पांच विणीची जाडी ( उ. ११६ ) व पांघरण्यास पासवडी (ए. ११; उ. ४७१ ) वापरीत असें दिसतें. स्त्रियांच्या वस्त्रांत ' खळीचा सारला ' म्हणजे कोरें रेशमी वस्त्र व चोळी ( पू. ५३ ), पातळ व लुगडें ( गो. १८५ ) आणि कांचोळी ( गो. १८० ) इतके उल्लेख येतात. पैकीं 'चीरचोळी' हें एक सौभाग्यचिन्ह असल्यानें दिसतें ( पू. ७१ ). स्त्रिया लुगडीं ' परिवंटा ' म्हणजे केळें करून नेसत ( पू. २७० ), तर पुरुषांत 'मालगंठी' व 'सुरकौन' अशा नेसण्याच्या दोन पद्धती रूढ होत्या ( उ. ११२ ). वस्त्रांचें ' दिंड ' म्हणजे बस्ता एका लीळेंत उल्लेखिला आहे ( उ. ४५७ ). ' अंग-दाटणा ' म्हणजे अंग पुसण्याचा रुमाल याचा उल्लेख मनोरंजक वाटेल ( उ. ४८४ ). लहान मुलांचें ' आंगुलें ' एका ठिकाणीं आढळतें ( उ. ३०६ ). स्नान करतांना ' पडदणी ' लावून घेण्याची प्रथा होती ( उ. १२४ ). वस्त्रांच्या विणावणीं ' घन ' म्हणजे दाट व ' पातळ ' म्हणजे विरळ असे दोन प्रकार असल्याचें दिसतात ( उ. ३४ ). चांदा,








पाटण व पुसद या ठिकाणीं वस्त्रांच्या मोठ्या पेठा असून तेथें वस्त्रें 'सबंग' होतीं असें एका लीळेवरून वाटतें (गो. १२२).

तत्कालीन पात्रांचा विचार करतां तुपासाठीं 'डो' (पू. ३५०) व तेलासाठीं 'कोढें' आणि 'टौळें' (उ. ६) हीं भांडीं विशेष उल्लेखनीय वाटतात. 'राहाटी' म्हणजे प्रपंचासाठीं लागणाऱ्या भांड्यांची उतरंड कोठें खापराची तर कोठें तांब्याची असे (गो. २७८). स्नानासाठीं 'कडीत' म्हणजे घंगाळ (गो. १७४), तर पाणी तापविण्यासाठीं 'लोहे' म्हणजे लोहपात्र (गो. २७३) वापरीत. गळती व तांबतौली (उ. २३६), वानरी (उ. २९८), वोडवणें (उ. ४०४) आणि आळंद (गो. ३८) हे पात्रविशेषहि उल्लेखनीय आहेत. पाणी कावडींतून आणण्याची प्रथाहि यादवकालांत रूढ दिसते (गो. १३०).

## आरोग्यविषयक निर्देश

प्रस्तुत चरित्रग्रंथांतील कांहीं उल्लेखांवरून तत्कालीन आरोग्यविषयक कल्पनांचा अंदाज बांधतां येईल. सकेशी पुरुष किंवा स्त्रिया यांच्या-मुळें उवा होतात ही कल्पना एका प्रसंगीं स्वतः चक्रधरांनीं बोलून दाखविली असून नागदेवास क्षौर करणें भाग पाडलें आहे (पू. २७१). शौच विधीनंतर हातपाय धुऊन शूचिर्भूत होण्याची कल्पना एकंदर समाजास मान्य होती (उ. ४३८). साधें जानवें सुद्धां चोखणी म्हणजे शिकेकाई लावून स्वच्छ करीत (गो. २७४). चिलटांचा व डासांचा उपद्रव निंबाच्या काड्यांचा धूर करून नाहींसा करीत (पू. १८१). तसेंच बरेच दिवस बंद असलेल्या जागेंतील पाकोळ्यांची दुर्गंधि तूर-भाताचा धूप करून घालवीत (उ. १७४). कांहीं विहिरींना आंत शिरण्यासाठीं उघडझांप करतां येईल असें 'वेशी-दार' असे. त्यावरूनहि आरोग्याचा हेतुच सूचित होतो (गो. १००). पाण-पोईवरील रांजणास 'धाकडे' म्हणजे तोट्या असत व त्यामुळें सहजच आरोग्य राखलें जाई (गो. २०). कांहीं घरांतून तरी 'पायखोला' म्हणजे पायखाना असे, असें दोन उल्लेखांवरून वाटतें (उ. ४१८, ४१९). घरांतून 'पन्हिवा' म्हणजे मोऱ्याहि असत व त्यांचें सांडपाणी पाट काढून दूरवर नेलें जाई. हीहि एक आरोग्याचीच बाब होय (गो. २७९). हें सांडपाणी जेथें जाई त्यास 'पाणवें' म्हणत व तेथें वांगीं किंवा पडवळें यां-सारख्या फळभाज्या लावीत (गो. २२२, २०१). असें असलें तरी मोऱ्यांची बांधणी बरोबर नसल्यानें कित्येकदां त्यांत चिखल होऊन किडेहि होत व मग त्यांतील दुर्गंधि नाहींशी करण्यासाठीं म्हणून त्या मोऱ्या उपसण्याचें काम चालें (पू. ३६८; गो. १६८).

## इतर बाबी

समाजाच्या संस्कृतीची कल्पना जशी त्याचें धार्मिक जीवन, आर्थिक व्यवहार किंवा चालीरीती यांवरून येतें, त्याप्रमाणेंच कांहीं किरकोळ वाटणाऱ्या बाबीहि त्याचें सांस्कृतिक मापन करण्यास उपयोगी पडतात. प्रस्तुत चरित्रग्रंथांतील अशा सर्व गोष्टींची नोंद करावयाची म्हटलें तर तें एक स्वतंत्र प्रकरण होईल. म्हणून तसें न करतां त्यांपैकीं कांहींचा येथें निर्देश मात्र करतों. यादवकालीन महाराष्ट्रीय समा-जांत अतीत-अभ्यागतांचें आदरातिथ्य ही एक महत्त्वाची बाब दिसते. अतिथीस घरीं नेऊन त्यास पाय धुण्यासाठीं पाण्याचा तांब्या पुढें करणें (ए. ६३), बसावयास आपल्या ऐपतीप्रमाणें कांबळें (गो. २७९) किंवा पायपुसणें (ए. ७६; पू. १-२), किंवा बाज-सुपवती (पू. १८२) देणें, अतिथीचें व्यक्तिमाहात्म्य ध्यानांत घेऊन प्रसंगीं त्यास स्वतःच्या अर्धासनावर बसविणें (उ. २७४; पू. १४२), अतिथि थकलाभागला असल्यास त्याची पाठ रगडून श्रमनिवृत्ति करणें (पू. २५९), याप्रमाणें पाहुण्यांची 'मानमान्यता' करण्याची आवड समाजांत दिसते. चक्रधरांसारख्या निवृत्ताच्या मठांत मात्र 'राबारकां'ना सारखाच मान असल्यानें तेथें अतिथींचें 'आव्हान विसर्जन' हा प्रकार नसे (उ. ७७). असो. समाजाच्या वापरांतील कांहीं वस्तु उल्लेखनीय आहेत. 'सुनेयाचें जवट' म्हणजे कुत्र्याचा पट्टा (पू. ६२), साव धरण्याची 'चीप' म्हणजे चिमटा (गो. १२०), कळदिवा (ए. ३८, ५४), 'वज्री' म्हणजे अंगघासणी (उ.








१६८ ), 'कुचिटाळें' म्हणजे कुलुप-किल्ली ( उ. १७४ ), बैलाचा 'गरगाडा' ( उ. २५१), शिंवेचा गुंडा ( उ. ४८९ ), घोड्याची 'चामडी' म्हणजे लगाम ( ए. ५५ ), दारूची भट्टी ( उ. ४१९ ), पाणी आणण्याची 'पाखाल' (गो. ७), धान्याच्या दुकानांतील 'गणेशा' ( गो. २१५ ), 'गुळहार' व त्यांतील काकवी ( गो. २३९ ), 'भूआगळ' म्हणजे अडसर ( गो. २८०, ९८ ), कापूर-करंडा ( गो २९३ ) इत्यादि वस्तूंचे उल्लेख मनोरंजक वाटतील. प्रापंचिक बाबींत पत्रावळी व द्रोण ( उ. ४७२ ), 'पर्से' व 'गिरगिटें' या दोन प्रकारच्या जाती ( उ. १३ ), सूप व खराटा ( उ. ३४३ ), चुलीचें 'पोतेरें' व जातें, पाटा आणि मुसळ यांवरील कापडाच्या गवसणी ( गो. १२२ ), सैपाकघरांतील उतरंड ( गो. २७८; उ. २२५ ), 'कुंपी' म्हणजे खुंटी ( गो. १७४), 'घरवात' व 'सेस' ( गो. २१३ ), तेलमीठ-वस्त्र-कापड-घडोतण ( पू. ३०२ ) इत्यादि गोष्टी उल्लेखनीय आहेत. पाणवठा व त्यावरील पाणी भरणाऱ्या बायकांची भांडणें ही संस्थाहि पुरातन कालापासून चालत आलेली दिसते ( पू. ११५ ).

समारोप

यादवकालील महाराष्ट्रांतील सामाजिक जीवनाचीं विविध अंगें हीं अशीं आहेत. या जीवनाचें साम्यग्-दर्शन घडविणें हा प्रस्तुत लेखमालेचा हेतु नसून एका समकालीन चरित्रकारानें लिहून ठेवलेल्या व गेलीं साडेसहाशें वर्षें बहुंशीं अविकृत राहिलेल्या स्मृतिग्रंथांची सामाजिक पाहणी करणें हा या लेखां-मागील हेतु आहे. म्हाइंभटाचे हे दोन चरित्रग्रंथ एका विशिष्ट पंथाचे असले तरी त्यांतील चरित्र-विषयाचा संबंध समाजांतील सर्व थरांशीं आला असल्यानें सामाजिक दृष्ट्या ते प्रातिनिधिक समज-ण्यास हरकत नसावी. यादवकालीन समाजाचें हें दर्शन समग्र व संपूर्ण नाहीं याची जाणीव लेखकास आहे. पण एक तर तें महानुभावीय दर्शन असल्यानें केव्हांहि सापेक्ष, अतएव अपूर्णच असणार हें उघड आहे. शिवाय संपादकांनीं घालून दिलेली जागेची मर्यादा लेखकानें आधींच ओलांडली असल्यामुळें याहून अधिक तपशिलांत शिरणें त्यास शक्य असलें तरी इष्ट नाहीं.

---

## सुखस्वप्न माझें —

सुखस्वप्न माझें आहे
अस्पष्ट त्या उषेपरि
थोडें उजळ, अंधुक
रंगरेषा संध्येपरी !
चांदण्यांत कालवले
ऊन तिथें सदा पडे
शुभ्र पारिजातकाचा
तिथें नित्य सडा पडे !
संथ निळ्या तळ्यामधें
शुभ्र हंस पोहताती
रसगंध कमळणी
डोकावती उमलती
आणि कांठावर थोडे
पलीकडे बाजूलाच
रंग पाचूची ल्यालेली
उभी बंगली माझिच
आणि तिच्या बाहेरच्या
मुक्त मस्त दालनांत
रिक्त मनानें टाकावें
अंग आरामखुर्चींत
किणकिण बिल्वरांची
आंतुन ये ऐकायाला
खेळ लाटांचा पाहावा
गंधवायू हुंगायाला
कधीं मोजीत चांदण्या
आभाळांत भटकावें
कधीं तोडीत कमळें
हंसामागें लहरावें
पश्चिमेच्या रंगांतुन
डोळे भरून घ्यावेत
प्रभातीची कोंवळीक
अशा ओळी लिहाव्यात...

—राजा मंगळवेढेकर



अनुक्रमणिका






प्रा. देवदत्त अ. दाभोलकर व प्रा. अ. भि. शहा

# प्राध्यापकवर्गाच्या आर्थिक-सामाजिक स्थितीचें दर्शन

'पुणें विद्यापीठ-अध्यापक-संघा'नें एक समिति नेमून प्राध्यापकवर्गाच्या एकूण परिस्थितीची एक पाहणी डिसेंबर १९५१ मध्यें हातीं घेतली होती. गतवर्षी या पाहणीचें काम पूर्ण होऊन तिचा अहवाल आतां प्रसिद्ध करण्यांत आलेला आहे.[1] या पाहणीसाठीं पुणें विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रांत काम करणाऱ्या महाविद्यालयांतील सर्व प्राध्यापकांना छापील प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आलेल्या होत्या. मेडिकल, एंजिनिअरिंग व शेतकी कॉलेजांतील प्राध्यापकांनीं या पाहणीविषयीं अनास्थाच दाखविली. त्यांच्याकडे पाठविलेल्या एकूण १३३ प्रश्नपत्रिकांपैकीं केवळ आठच भरून परत आल्या. प्रगत समजल्या जाणाऱ्या व्यवसायांतील लोकांची अशी अनास्था पाहिली कीं, आपल्या देशांत सामाजिक व आर्थिक पाहणीचें काम किती बिकट आहे याची मात्र अधिक स्पष्ट कल्पना येऊं लागते. तंत्रविज्ञानविषयक शिक्षणाचीं वरील महाविद्यालयें वगळल्यास इतर महाविद्यालयांतून पाठविलेल्या ३७६ प्रश्नपत्रिकांपैकीं १६९ भरून परत आल्या. यांत सरकारी कॉलेज असें राजाराम कॉलेज हें एकच होतें. त्यामुळें ही पाहणी सामान्यपणें खाजगी शिक्षणसंस्थांच्या महाविद्यालयांतून काम करणाऱ्या प्राध्यापकवर्गाच्या परिस्थितीची निदर्शक आहे, असें मानावयास हरकत नाहीं.

प्रश्नपत्रिका भरतांना कांहीं प्रश्नांचीं उत्तरें कांहीं प्राध्यापकांनीं दिलेलीं नव्हतीं. परंतु प्रत्येक प्रश्नाच्या बाबतींत असे लोक थोडेच असल्यामुळें, माहितीची सर्वसामान्य तुलना एकूण भरून आलेल्या प्रश्नपत्रिकांच्या आंकड्यां-( १७७ )शीं करावयास हरकत नाहीं. अहवालांत अर्थातच प्रत्येक प्रश्नाबाबत निश्चित माहिती देण्यांत आलेली आहे. विशेष जिज्ञासूंना तेथून ती मिळवितां येईल.

ह्या प्राध्यापकांपैकीं ९७ प्राध्यापकांनीं वयाला पंचवीस वर्षे पूर्ण व्हावयाच्या आंतच या व्यवसायांत पदार्पण केलेलें होतें. तिशी उलटून गेल्यानंतर या व्यवयासांत आलेले ३२ लोक होते. या व्यवसायांत येण्यापूर्वी ८५ प्राध्यापक इतर व्यवसायांतून काम करीत होते. परंतु त्यांपैकीहि ६८ जण दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून शिक्षकाचें काम करून नंतर या व्यवसायांत आलेले आहेत. शिक्षण-कार्याची आवड असणाऱ्या व्यक्तीच मुख्यत्वेंकरून या व्यवसायांत आलेल्या आहेत, हें यावरून दिसून येईल. 'आपण या व्यवसायांत कां पडलांत ?' या प्रश्नाला प्राध्यापकांनीं दिलेल्या उत्तरांवरूनहि ही गोष्ट स्पष्टपणें दिसून आली. शिक्षकाच्या पेशाची आवड, अभ्यास व संशोधन यांना वाव मिळेल अशी अपेक्षा, निवान्त वातावरणाची आवड,--अशींच व्यवसायाला साजेशीं उत्तरें बहुतेक प्राध्यापकांनीं दिलीं. या कारणाबरोबरच 'अगतिक होऊन आपल्याला या व्यवसायांत यावें लागलें काय ?' या प्रश्नाला ४५ प्राध्यापकांनीं होकारार्थी उत्तर दिलेलें आढळलें.

प्राध्यापकांची आपल्या व्यवसायाविषयीं आस्था व्यक्त होऊं शकेल असा दुसराहि एक प्रश्न विचारण्यांत आलेला होता. 'आपल्याला दरमहा किती अधिक पगार देऊं केल्यास आपण हा व्यवसाय सोडून दुसरा व्यवसाय स्वीकाराल ?' असा तो प्रश्न होता. मासिक २०० रुपये पगार अधिक मिळाला तर त्यासाठीं ५५ प्राध्यापक हा व्यवसाय सोडावयास सिद्ध होते. ३३ प्राध्यापकांनीं या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. ६८ प्राध्यापकांनीं मात्र केवळ पगारवाढीसाठीं म्हणून आपण हा व्यवसाय सोडणार नाहीं असें निश्चितपणें सांगितलें. यांत पीएच्. डी. ही पदवी घेतलेल्या १७ प्राध्यापकांपैकीं १४ प्राध्यापक

1. A Study of the Social, Economic and Educational Problems of the Full-time College Teachers in Poona University Area, conducted by the Poona University Teachers' Association, Poona ( 1953 ).

होते. इतर तिघांनीं प्रश्नाचें उत्तर दिलें नव्हतें. यावरूनहि या व्यवसायाविषयींचें धोरण आंखतांना योग्य तें मार्गदर्शन मिळूं शकेल.

'व्यवसायांत शिरतांना आपण बाळगलेल्या अपेक्षा पूर्ण झाल्या' असें म्हणणारे मात्र केवळ ५७ प्राध्यापकच निघाले. ४७ प्राध्यापकांनीं गुळमुळीत उत्तर दिलें, तर ७२ जणांनीं आपला अपेक्षाभंग झाला असें सांगितलें.

या प्राध्यापकांचें सरासरी वार्षिक उत्पन्न ३४५० रुपयांचें होतें. प्रत्येकाच्या कुटुंबांत सरासरीं ४·२ मोठीं माणसें होतीं. (लहान मुलांचें मोठ्या माणसांत एका विशिष्ट प्रमाणानें परिवर्तन करण्यांत आलें.) नवरा-बायको व मुलें या कुटुंबियांखेरीज या १७७ लोकांवर अवलंबून असणाऱ्या इतर कुटुंबियांची संख्या १९६ होती. आपल्या कार्यक्षमतेला आवश्यक असें राहणीचें मान ठेवणें अर्थातच अनेकांना अवघड होऊन बसलेलें आहे. ५६ लोकांच्याच घरीं रेडिओसेट होता. टाइप-रायटर २६ जणांच्या घरीं होता, तर विजेचा पंखा केवळ सहाजणांकडेच होता. ९५ लोकांना तीनहून कमी खोल्यांची राहावयाची जागा घेतां आली व ८४ प्राध्यापकांनीं आपल्याला अभ्यासासाठीं स्वतंत्र खोली नसल्याचें सांगितलें. ४३ प्राध्यापकांकडे त्यांच्या विषयांतील पुस्तकें नव्हतीं. आपल्या विषयांतील शंभरांहून अधिक पुस्तकें जवळ असणारे ५२ प्राध्यापक होते. इतर आवडीच्या विषयांतील पुस्तकांविषयींचे हेच आंकडे अनुक्रमें ५५ व ३६ असे होते. २८ प्राध्यापकांचा खाजगी पुस्तकसंग्रह १०० रुपये किंमतीचाहि नव्हता.

वार्षिक उत्पन्न व वेगवेगळ्या गोष्टींवरील कुटुंबाच्या खर्चाचें प्रमाण यांविषयींचेंहि एक कोष्टक तयार करण्यांत आलेलें खालीं दिलें आहे.[२] त्यावरूनहि उत्पन्नाचा व व्यावसायिक कार्यक्षमतेचा संबंध लक्षांत येईल.

पांच हजार रुपयांपर्यंत उत्पन्न असल्यासच आजच्या परिस्थितींत प्राध्यापकाला साधारण सुस्थितीचें मान राखतां येईल, हें यावरून दिसून येतें. ५६ प्राध्यापकांना कर्जें होतें व त्याची सरासरी प्रत्येकीं २२२७ रुपये अशी होती. हीं कर्जें मुख्यत्वेंकरून घरखर्चासाठीं व आपल्या व कुटुंबियांच्या शिक्षणासाठीं काढलेलीं होतीं.

उत्पन्नाविषयींची इतरहि कांहीं माहिती उद्बोधक ठरेल. या प्राध्यापकांपैकीं २० जणांच्या घरीं स्त्रीहि मिळविती होती. खासगी शिकवण्या फक्त १८ जणच करीत होते व त्यांचें सरासरी वार्षिक उत्पन्न २२६ रुपयांचें होतें. केवळ २३ जणांजवळच उत्पन्न देणारी अशी कांहीं वडिलोपार्जित मिळकत होती. परीक्षकांचें काम करून मात्र १२२ प्राध्यापकांनीं वार्षिक सरासरी ३३३ रुपयांचें उत्पन्न मिळविलें होतें.

१०७ प्राध्यापकांनीं, आपल्या कार्यक्षमतेच्या आड येणाऱ्या गोष्टी कोणत्या हें सांगतांना, सर्वांत अधिक वेळां आर्थिक अडचणींचा उल्लेख केला.

---

२. **वार्षिक उत्पन्न व खर्चाचें प्रमाण**

| पगार : | २५०० रुपयांपर्यंत | रु. ३००० ते ३५०० | पांच हजारांहून अधिक |
|---|---|---|---|
| जेवणखाण | १४०४ | १५६९ | २५६३ |
| घरभाडें | ३७२ | ५०८ | ६९६ |
| स्वयंपाकी-नोकर | ८४ | १७२ | ४०४ |
| प्रवास | ८३ | १४१ | ३०० |
| पुस्तकें | २९ | ६७ | २६८ |
| क्लब-जिमखाना | ४८ | ७० | १२० |
| व्यावसायिक संस्थांची वर्गणी | १३ | ३१ | ५९ |










व्यवसायांत शिरतांना संशोधनाविषयींची अनेकांना आस्था असलेली आढळून आली. परंतु पीएच्. डी. घेतलेले लोक मात्र अवघे १७ जणच होते. या व्यवसायांत बढती देतांना संशोधन-कार्याची कसोटी लावावी हें १४० जणांना मान्य होतें. परंतु यासाठीं आवश्यक त्या सोयी-सवलती मिळाव्यात, अशी मात्र त्यांची मागणी होती. अंगच्या आळसामुळें आपण संशोधनकार्य केलें नाहीं असें ३७ जणांनीं प्रामाणिकपणें कबूल केलें. आर्थिक मदत, पुस्तकें व इतर साधनांची सुलभता व कॉलेजच्या कामांतून सवड ह्या मुख्य मागण्या होत्या. ४२ जण पुढील अभ्यासासाठीं निम्म्या पगारावर रजा घ्यावयास तयार होते. दोघांची तर बिन-पगारी रजेसाठींहि तयारी दिसली.

प्राध्यापकांनीं केलेल्या लेखनकार्याची माहिती अशी : ( कंसांतील आंकडे किती प्राध्यापकांनीं तें कार्य केलें हें दर्शविणारे आहेत. )

**संशोधनात्मक पुस्तकें : ६९ ( ३२ )**
**संशोधनात्मक निबंध : ५७४ ( ६१ )**
**पाठ्यपुस्तकें : १५९ ( ३४ )**
**टिपणवजा पुस्तकें : १४१ ( २६ )**
**इतर लेख : १११८ ( ७३ )**

प्राध्यापकांनीं राजकीय गोष्टींत भाग घेण्याला ४० लोकांचा विरोध होता. इतर सर्व अध्यापकांच्या स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते. १६ प्राध्यापक सामाजिक कार्यक्षेत्रांत व चौघेजण राजकीय कार्यक्षेत्रांत काम करीत होते. त्यांची आठवड्याची या क्षेत्रांतील कामाची सरासरी ५ ते ६ तासांची असे. सुट्टीच्या दिवसांत विनावेतन विधायक कार्यासाठीं आपला वेळ द्यावयाची १४५ प्राध्यापकांनीं तयारी दर्शविली. ३० प्राध्यापक १५ दिवस या कार्यासाठीं द्यावयास तयार दिसले. महिनाभर देऊं करणारे ७४ व महिन्याहून अधिक सवड काढूं शकणारे ३१ प्राध्यापक निघाले. दिवसांचे आंकडे ढोबळ मानानें घातले असल्याचा संभव आहे. कदाचित् प्रत्यक्ष कार्यांत कांहीं टिकणारहि नाहींत. परंतु तरीहि सर्वांना आवाहन करून पाहाण्यासारखें आहे.

या व्यवसायांत अजून पुष्कळच सुधारणा करतां येण्यासारखी आहे. अध्यापन, वाचन, संशोधन इत्यादि सर्व गोष्टी मिळून आठवड्याला २४ तासांपेक्षांहि कमी काम करणारे ४१ प्राध्यापक होते. परंतु या उलट, आठवड्याला ४८ तासांहूनहि अधिक काम करणारे ३५ प्राध्यापक होते, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. कांहीं कमी काम करणारे प्राध्यापक अधिक काम कसें करतील व आत्मीयतेनें अधिक काम करणाऱ्या प्राध्यापकांना उत्तेजन कसें मिळेल व त्यांची कार्यक्षमता कशी वाढूं शकेल याचा नीट विचार झाला पाहिजे. या पाहणींतून मिळत असलेल्या या यथार्थ दर्शनाचा यासाठीं कांहीं उपयोग होऊं शकेल असें वाटतें.

शेवटीं एक गोष्ट नमूद करणें आवश्यक आहे. आम्हां दोघांचाहि या पाहणीशीं निकट संबंध आलेला होता. यामुळें वरील सारांश देतांना केलेल्या सूचना वा टीकात्मक विधानें हीं आमचीं दोघांचीं आहेत हें स्पष्ट करणें आवश्यक वाटतें. समितीनें केवळ वस्तुस्थितिनिदर्शक अहवाल प्रसिद्ध केला आहे. त्यावरून प्रत्येक सुजाण माणसाला योग्य ते निष्कर्ष काढतां येतील.

---

**मुंबई विद्यापीठाच्या** प्राध्यापक-संघानें प्राध्यापकवर्गाची आर्थिक-सामाजिक परिस्थिति नुकतीच अजमाविली. ८५० प्राध्यापकांना प्रश्नपत्रिका पाठविल्या, त्यांपैकीं १५५ नीं म्हणजे शें. १८ नींच उत्तरें पाठविलीं. या आलेल्या उत्तरांवरून निघणारे कांहीं निष्कर्ष असे : ( १ ) शें. ४९ ना वाटतें कीं, शिक्षणाचा दर्जा खालावला आहे; शें. २९ च्या मतें, शिक्षणाचा दर्जा सुधारला आहे. शें. २२ च्या मतें, पूर्वींच्यांत व आतांच्यांत फरक नाहीं. ( २ ) शें. २१ नाच क्लबचे सभासद होण्याची ऐपत आहे. ( ३ ) दर आठवड्याला अभ्यासाला २४६३ मिनिटें मिळतात. ( ४ ) विवाहितांपैकीं शें. १७ च्या पत्नींना कुटुंबाचा खर्च चालावा म्हणून नोकरी करावी लागते. ( ५ ) 'कोठून हा व्यवसाय पत्करला ! ' अशी खंत शें. ८ ना वाटते. ( ६ ) इतर कोणत्याहि व्यवसायापेक्षां आपला हा व्यवसाय मानाचा आहे, असें शें. ६१ ना वाटतें.—' टाइम्स ऑफ इंडिया ' ( २१-२-५३ ) वरून



अनुक्रमणिका






डॉ. वासुदेवशरण अग्रवाल : अनु. श्री. श्रीपाद जोशी

# आचार्य नंदलाल बोस

ता. १ ते ३ मार्च १९५१ पर्यंत शान्तिनिकेतनमध्यें श्री. नन्दलाल बसु यांच्या सहवासांत मी राहिलों. सावळा रंग, तोंडावर शांति आणि दृढनिश्चय, डोळ्यांमध्यें दूरवर पाहणारी भेदक दृष्टि, व्यक्तित्वाभोंवतीं सजीव विद्युत्प्रवाह, वृद्ध शरीरामध्यें लहान मुलासारखी स्फूर्ति, वागणुकीमध्यें सरळपणा आणि चैतन्य, स्वच्छ मन, सखोल सहानुभूतीचे भाव—अशा प्रकारचें नन्दलाल बसूंचें सजीव व्यक्तिमत्त्व त्यांना भेटतांच मनावर ठसतें. त्यांचे चिरंजीव श्री. विश्वरूप बोस यांनीं कृपा करून आमच्यासाठीं श्री. नन्दलालबाबूंच्या चित्रांचें एक खास प्रदर्शन भरविलें होतें. त्यांतील चित्रांसंबंधीं चर्चा सुरू होतांच नन्दलालबाबू म्हणाले, 'या बाबतींत मी स्वतः कांहीं बोलूं शकणार नाहीं.'

आम्ही तीन दिवसपर्यंत मनसोक्तपणें चित्रांचें रसास्वादन केलें. तिसऱ्या दिवशीं सकाळीं त्या महान् चित्रकाराच्या तोंडून चार शब्द ऐकण्यास मिळाले. ते शांतपणें कलाभवनाच्या संग्रहालयांत बसले. चोहोंबाजूंनीं त्यांच्या शिष्यांनीं त्यांना घेरलें आणि मग ते मला उद्देशून बोलूं लागले :

"खासगी संग्रहामध्यें चित्रांचें संरक्षण होईलच अशी खात्री नसते. म्हणून वस्तुतः राष्ट्रीय संग्रह असणेंच योग्य होय कलकत्यामध्यें अमुक... अमुक...गृहस्थांनीं चित्रप्रेमी बनून चित्रांचा संग्रह केला, परंतु त्यांनीं तीं चित्रें परदेशांत विकून टाकलीं. आपल्या चित्रांना आपल्यापासून दूर जाऊं देण्यांत चित्रकाराला अत्यंत दुःख होतें. आपल्या देशाच्या प्रतिनिधींनीं माझ्या चित्राविषयीं योग्य प्रकारें मला लिहिलें किंवा सांगितलें असतें तर आपलीं चित्रें राष्ट्रीय संग्रहालयांत ठेवण्याचा माझा संकल्प पूर्ण झाला असता. माझीं चित्रें विकत घेण्यास कोणी आलें तर त्याबद्दल मला कांहीं आनंद होत नाहीं. असो. माझ्या चित्रांच्या कांहीं अनधिकृत नकला अितर लोकांनीं बनविल्या आहेत. त्या बाबतींत त्यांनीं मला विचारलें असतें तर जास्त चांगलें झालें असतें."

थोड्या वेळानें ते पुन्हां बोलूं लागले, "अवनीबाबूंचा पुष्कळसा संग्रह इकडे तिकडे विखुरला गेला. त्यांच्याजवळ आतां चांगली सामग्री काय उरलेली असणार? अवनीबाबूंनीं मोगल चित्रकारांच्या आराखड्यांचे दहा-बारा संग्रह एकत्र केले होते. ते त्यांच्या संग्रहाबरोबर कस्तूरभाअींकडे गेले. अवनीबाबू लहानपणापासूनच चित्र-

---

सुप्रसिद्ध भारतीय चित्रकलाकार, विश्वभारतीच्या चित्रकलाविभागाचे प्रमुख आचार्य नंदलाल बोस यांना नुकतेंच, गेल्या १४ फेब्रुवारी १९५३ ला ७० वें वर्ष संपून एकाहत्तरावें वर्ष लागलें. त्या निमित्तानें श्री. नंदलाल बोस यांचें व्यक्तिमत्त्व व कला यांचें शब्दचित्र रेखाटणारा, प्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित डॉ. अग्रवाल यांचा प्रस्तुत लेख वाचकांस औचित्यपूर्ण आणि उद्बोधक वाटेल. डॉ. अग्रवाल यांचा हा लेख मूळ हिन्दीमध्यें 'आजकल' या मासिकाच्या मे १९५१ च्या अंकांत प्रसिद्ध झाला होता. 'आजकल'च्या संपादकांच्या कृपेनें त्या लेखाचा अनुवाद येथें दिला आहे.—का. सं.







कलेचा अभ्यास करूं लागले होते. त्या वेळचीं त्यांचीं रेखाचित्रें फारच रोचक आहेत. ''

पहिल्याच दिवशीं चित्रांच्या प्रदर्शनांत तप करीत असलेल्या पार्वतीचें नन्दलाल बसूंनीं काढलेलें चित्र पाहून मी अगदीं थक्क झालों होतों. त्याची छाप माझ्या मनावरून पुसतच नव्हती. त्या चित्रामध्यें मला कालिदासाच्या 'कुमारसंभवा'-च्या पांचव्या सर्गातील पार्वतीचें प्रत्यक्ष दर्शन घडलें. तीस वर्षांपूर्वीं कालिदासाच्या तपोनिष्ठ पार्वतीचें एक उज्ज्वल चित्र माझ्या मनःपटलावर अंकित झालेलें होतें. तें आजहि अमर आहे. कवीच्या त्या चित्रामध्यें पार्वतीच नव्हे तर स्वतः भारतीय संस्कृति मूर्तिमान् झालेली आहे. विषाद आणि निराशा यांच्या अंधकाराला भेदून पुनः पुन्हां आत्मज्ञान, आत्मचेतना प्राप्त करण्याचें जें वैशिष्ट्य तिच्या ठिकाणीं आहे तीच पार्वतीची तपःसाधना नव्हे काय ? चित्रामधील पार्वती पर्वतराज हिमालयाच्या शिखरामध्यें उभी आहे. पित्याची अमर मांडी तिला प्राण-शक्ति देत आहे असा भास होतो. तिचा धूसर वर्ण शिखरांशीं एकरूप झालेला आहे. संकल्पाची वज्रासारखी दृढता शिलाखंडांच्या रूपानें तिच्या सभोंवार साकार बनलेली आहे. अखंड तप, अखंड ध्यान, शिवाच्या प्राप्तीसाठीं अखंड समाधि-हीच प्राणाची एकमेव साधना आहे. हृदयाशीं धरलेल्या हाता-मध्यें हिरव्यागार दर्भाची अेक पवित्री (अंगठी) आहे. पांढुरक्या देहामध्यें तो हिरवागार बिंदूच प्राणाचें एके ठिकाणीं गोळा झालेलें रूप आहे, असें वाटतें. 'कुमारसंभवा' च्या पांचव्या सर्गांत कालिदासाचा जो भाव आहे त्याची अमर व्याख्या, त्याचा खुलासा या चित्राच्या रूपानें आपल्या-समोर उभा राहतो. याच मार्गानें चित्रकार आणि शिल्पकार संस्कृतीच्या अमूर्त भावांना मूर्त रूप देत असतात. देशांतील किती भावी चित्रकार या कामीं अजून साहाय्य करतील ? त्या चित्राविषयीं माझ्या मनांतील श्रद्धा मीं व्यक्त केली. त्यायोगें चित्रकाराचें कोमल हृदय आर्द्र झालें आणि ते म्हणाले :

" या चित्रामागें एक इतिहास आहे. अवनी-बाबू माझे गुरु. मी त्यांच्याजवळ पुष्कळ दिवस शिकत होतों. त्यांना सोडून मी येथें आलों तेव्हां त्यांना फारच दुःख झालें. पुढें मीं एक चित्र तयार केलें आणि तें त्यांना दाखविण्यासाठीं कलकत्त्याला घेऊन गेलों. ते म्हणाले, 'तुझें मन आणि हात दोन्ही बिघडून गेले !' त्यांच्या या वाक्यानें माझें मन विषादानें भरून गेलें. आपल्या बुडणाऱ्या मनाला आधार देण्यासाठीं मीं 'शोकार्त उमा' हें चित्र तयार केलें. रूपगर्विता उमेसमोरच शिवानें कामदेवाला भस्म करून टाकलें तेव्हां पार्वतीचें मन देखील अशाच प्रकारच्या विषादामध्यें बुडून गेलें होतें. मीं माझ्या स्वतःच्या मनांतील दुःख त्या चित्रामध्यें ओतलें. चित्र पूर्ण करून मी तें अवनीबाबूंकडे घेऊन गेलों. त्यांनीं तें पाहिलें व त्यांना अत्यंत आनंद झाला. ते म्हणाले, 'ठीक झालें, अजून कांहीं बिघडलें नाहीं !' आतां हें चित्र प्रफुल्लनाथ ठाकूर यांच्या संग्रहांत आहे. मनाला आश्वासन मिळाल्यानंतर मीं दुसरें एक चित्र बनाविलें. 'शोकार्त उमे'चा उत्तराधिकार प्राप्त करणाऱ्या पार्वतीच्या तपश्चर्येचें तें चित्र होतें. तें चित्रहि अवनीबाबूंना दाखविण्यासाठीं मी घेऊन गेलों. तेव्हां ते म्हणाले, 'चित्र बरें आहे, परंतु त्यांत रंग भरला पाहिजे. रंग हाच चित्राचा गुण.' मी मूक सम्मति दर्शवून परत आलों. मी चार वाजतां त्यांना चित्र दाखविलें होतें. सहा वाजतां ते स्वतःच माझ्या घरीं आले आणि म्हणाले, 'अजून रंग भरला नाहींस ना ?' मी उत्तरलों, 'उद्यां सकाळीं रंग देणार आहे.' त्यावर ते म्हणाले, 'त्या चित्राला रंग देऊं नकोस. तें तपश्चर्येचें चित्र आहे. त्यामध्यें पार्वतीचा सर्व अनुराग विलीन झालेला होता. त्यांत भडक रंग भरण्यास मीं तुला सांगितलें ही माझी चूक झाली. आतां मी स्वतःच तुला एक चित्र तयार करून देतों.' त्याप्रमाणें कांहीं दिवसांनीं त्यांनीं 'उमेचें मस्तक' हें चित्र तयार केलें आणि मोठ्या प्रेमानें तें मला देत ते म्हणाले, 'ही माझी मुलगी आहे. जिवांत जीव असेपर्यंत तूं हिला संभाळून ठेव.'

आणि खरोखरींच 'उमेचें मस्तक' हें चित्र












# आचार्य नंदलाल बोस

श्री. अवनींद्रनाथ ठाकुर यांच्या या सुप्रसिद्ध शिष्याला आजहि प्राणांहून प्रिय आहे.

त्यानंतर श्री. नंदलाल बसू यांनीं हरिपुरा कॉंग्रेससाठीं तयार केलेल्या चित्रांसंबंधीं बोलतांना सांगितलें, " त्या वेळीं गांधीजी म्हणाले होते : ' चित्रसाधना घरच्यांसाठीं करूं नका, बाहेरच्यांसाठीं करा. रस्त्यांत ठेवण्यासाठीं चित्रें काढा म्हणजे खेड्यांतील लोकांनाहि तीं पाहावयास मिळतील. ' एक महिन्यांत हें काम झालें. त्यांपैकीं कांहीं सामग्री येथें आली, बाकीची वर्ध्यास राहिली होती. ती १९४२ च्या चळवळीमध्यें नष्ट झाली. "

श्री. नंदलाल बसू यांनीं हरिपुरा कॉंग्रेससाठीं काढलेल्या त्या चित्रांचा विषय भारतीय लोक-जीवन हा आहे. भडकदार रंग आणि कुंचल्याच्या वेगवान् ठळक रेखा यांच्या द्वारें बहुरंगी लोकजीवन व्यक्त करण्याचा यशस्वी प्रयत्न त्या चित्रां-मध्यें करण्यांत आला आहे. तीं चित्रें पाहून गुरु-देवांना आनंद झाला व ते म्हणाले, " हा तुझा नवीन दिक्‌प्रवेश आहे. "

मीं नंदबाबूंना विचारलें, " आपण कधीं मूर्ती बनविल्या आहेत काय ? " त्यावर ते म्हणाले, " अशाच एक-दोन बनविल्या आहेत झालें. "

त्यानंतर शास्त्रीय चर्चा सुरू झाली. नंदलाल-बाबू म्हणाले, " हिंदुस्थानांत कांशाच्या जुन्या मूर्ती पुष्कळ सांपडतात, परंतु चित्रें दिसत नाहींत. याचें काय कारण असावें ? मला वाटतें, चित्रें देखील पुष्कळ होतीं, परंतु तीं नष्ट झालीं. अजिंठ्याच्या वगैरे काळांत भित्तिचित्रांखेरीज फलकचित्रेंहि असंख्य असलीं पाहिजेत. परंतु तीं आतां सांपडत नाहींत. नेपाळमध्यें व तिबेटांत मंदिरांचे जे थन्के अथवा ध्वजपट आढळतात ते भारतीय चित्रपटांच्या पद्धतीप्रमाणें आहेत. जी गोष्ट पूर्वीं होती तीच आजहि आहे. "

यानंतर श्री नन्दलाल बसूंनीं अजिंठ्याच्या चित्रशैलीच्या आधारें जे नवीन प्रयोग केले आहेत त्यांसंबंधीं चर्चा सुरू झाली. चित्रांसाठीं त्याच प्रकारची भूमि ( पृष्ठभूमि ) बनविण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे आणि रंगाच्या सामग्रीचे नमुने गोळा केले आहेत. अजिंठ्यामध्यें भिंतीवर ज्या लेपाचा थर देण्यांत आलेला आहे तो पुष्कळ जाड आहे. त्यांत भाताचा कोंडा, ज्वारीचा कोंडा, शेण आणि माती मिसळलेली आहे. बाघ येथील लेपामध्यें हत्तीच्या लिदीच्या रूपानें मिसळलेला लांकडाचा लगदा देखील वापरलेला आहे. आधीं निम्मी माती व निम्मी वाळू यांचें मिश्रण करून त्यांत शेण, कोंडा व गोंद मिसळत असत. हा लेप सुकल्यानंतर तो कडक व पाणी शोषून घेणारा बनत असे. त्यासाठीं वाळवीच्या वारुळांतील माती घ्यावी लागे. त्या मातींत खडे किंवा दुसरी खरखरीत वस्तु नसे. शेण देखील जंगली जनावरांचें असे. कारण त्यांत अम्लांश अधिक नसतो. घरच्या गायी खाल्लेला चारा नीट पचवूं शकत नाहींत. म्हणून त्यांच्या शेणांत अम्लांश ( आंब ) अधिक असतो.

चित्राची पार्श्वभूमि बनविण्याची ही प्रक्रिया येथें यशस्वी झालेली आहे. भिंत वाळल्यानंतर तिच्यावर शाडूचा लेप देण्यांत येतो. डिंकामध्यें चंदनरसाचा डिंक सर्वांत चांगला. अजिंठ्याच्या लेपामध्यें अंड्यांतील पिवळ्या बलकाचाहि उपयोग करण्यांत आला असावा असें अनुमान आहे. ज्या ठिकाणीं पार्श्वभूमि पातळ होती तेथें असें करण्यांत आलें आणि तेथील रंग निघाला नाहीं. सरगुजा येथील भित्तिचित्रांमध्यें पातळ सफेतीवर चित्रें काढण्यांत आलीं आहेत. तेथें अंड्यांतील पांढरा बलक अवश्य लावला असला पाहिजे. अजिंठा, बाघ, सरगुजा, वेलनिया ( सिलोन ), कान्हेरी, मध्य आशिया, जयपूर वगैरे ठिकाणच्या नव्या-जुन्या भित्तिचित्रांच्या प्रलेपांचे नमुने आणि त्यांत वापर-ण्यांत आलेल्या मातीच्या व दगडाच्या रंगांचे नमुने संगृहीत करून त्यांचें प्रयोगात्मक परीक्षण शान्तिनिकेतनामध्यें करण्यांत आलें आहे. जयपूरचे चित्रकार आजहि परंपरागत पद्धतीनें पार्श्वभूमि तयार करतात आणि देशी रंगांनीं चित्रें चितारतात. भारतीय परंपरेपासून सुटून दूर गेलेल्या आर्ट-स्कुलांनीं विलायती रंग व विलायती प्रक्रिया ग्रहण केली आहे. त्या स्कुलांमधून निघालेले बहुतेक विद्यार्थी त्याच पद्धतीचें अनुकरण करीत असतात. परंतु श्री. नन्दलाल बसु यांनीं किती तरी वर्षां-

पासून जुने रंग आणि लेपनसामग्री यांचें सूक्ष्म अध्ययन करून त्यांचा उद्धार केला आहे. ते स्वतः आणि त्यांचे शेंकडों शिष्य स्वतः आपले रंग आणि कुंचले तयार करून घेतात. सर्वांत बारीक कुंचला खारीच्या केसांपासून करतात. त्याहून थोडा जाड वासराच्या कानांतील केसांपासून आणि त्याहून जाड बकऱ्याच्या केसांपासून तयार करण्यांत आला आहे. या कुंचल्यांच्या साहाय्यानें स्वतः श्री. नन्दलाल-बाबू चित्रें काढतात. बडोद्याच्या रंगमहालांतील सर्व भित्तिचित्रें त्यांनीं वासराच्या कानांतील केसां-पासून बनविलेल्या कुंचल्यांनीं काढलेलीं आहेत. चीन देशांत कुंचला तयार करण्याच्या कलेची विशेष प्रगति झालेली आहे असें त्यांनीं सांगितलें.

यानंतर लोककलेची चर्चा चालली असतां अल्पनेचा विषय निघाला. ही कला देशव्यापी आहे. राजस्थानांतील 'मेंहदी मॉडना', गुजरात-महाराष्ट्रांतील 'रांगोळी', उत्तर प्रदेशांतील 'चौक पूरना', बिहारचा 'अैपन' आणि बंगालची 'अल्पना' हीं सर्व एकाच कलेचीं रूपें होत. दक्षिण भारतांत आणि गुजरातेंत ही कला आकृतिप्रधान आहे आणि बंगालमध्यें वल्लरी-प्रधान आहे.

शान्तिनिकेतनमध्यें श्री. नन्दलाल बसूंनीं भित्तिचित्रांच्या बाबतींत आणखीहि अनेक प्रयोग केले आहेत. एकदां शान्तिनिकेतनमधील विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाची अडचण दूर करण्यासाठीं गांधीजींनीं बारा हजार रुपये दिले आणि श्री. नंदलालबाबूंना वसतिगृहाचा आराखडा तयार करण्यास सांगितलें. त्यांनीं कच्च्या घरांचा एक आराखडा तयार केला. तो गांधीजींना पसंत पडला व त्याप्रमाणें चाळीस विद्यार्थ्यांसाठीं झोपड्या बनविण्यांत आल्या. त्यांच्या बाहेरच्या कच्च्या भिंतींवर वाळू व चुना यांच्या मोठ्या आकाराच्या सुमारें चाळीस मूर्ती बनविण्यांत आल्या आहेत. श्री. नंदलालबाबूंनीं स्वतः बरोबर येऊन त्या मूर्ती मला दाखविल्या. त्या झोपड्यां-च्या कच्च्या भिंतींवर आंतील बाजूस भित्तिचित्रें काढण्यांत आलीं आहेत.

कलाप्रेमी व्यक्ती आपल्या मानसिक आह्लादा-साठीं कच्च्या व पक्क्या अशा सर्व प्रकारच्या पार्श्वभूमीवर चित्रें काढीत असतात. कला ही मनुष्याच्या अगदीं जवळ असते. मात्र ज्याप्रमाणें आपण आपल्या उंबरठ्याजवळ हरळी वाढूं देत नाहीं त्याप्रमाणें कलेला प्रतिबंध करतां कामा नये. मनुष्याची सौंदर्यभावना कलेच्या रूपानें त्याला चोहों बाजूंनीं घेरून टाकूं इच्छिते. ती अर्थसाध्य नसून भावना व श्रम यांच्या योगानें सिद्ध होत असते.

शान्तिनिकेतनमधील प्रत्येक भवनाच्या भिंतींवर भित्ति-चित्रें काढण्यांत आलेलीं आहेत. तीं सर्व चित्रें चित्राचार्य 'मास्टर मोशाय' नंदलालबाबू आणि त्यांचे शेंकडों शिष्य यांच्या उत्साहपूर्ण कुंचल्यांतून सहजासहजीं बाहेर पडलीं आहेत. विश्वभारतीच्या जीवनावर भारतीय अन्तःकरणाची छाप आहे. स्वतः गुरुदेव जेथें राहात असत त्या उत्तरायणाच्या आस्थानमंडपामध्यें देखील आम्हीं देशी पद्धतीचीं शय्यासनें पाहिलीं. कोठेंहि बेडस, विलायती सोफे व कोच यांनीं भवनांमध्यें कुरूपता आणलेली नाहीं. गुरुदेवांच्या स्वतःच्या खोलीच्या भिंतींवर पुरुषभर उंचीच्या वेतांनीं विणलेल्या सुंदर चटया चौकटींतून बसविलेल्या आहेत, त्या फार छान दिसतात. राजस्थानी घरांतूनहि भिंतींचा खालचा भाग (त्याला 'इजारा' असें म्हणतात) चित्रांनीं सुशोभित केलेला असतो.

श्रीनिकेतनामध्यें नाना तऱ्हेच्या शिल्पकलेच्या वस्तू तयार करण्यासाठीं श्रीभवनचें कार्य फारच उत्तम प्रकारें चाललेलें आहे. तेथें देखील आम्हांला नन्दलाल बसूंची छाप पडलेली आढळली. वस्त्रें, मातीचीं खेळणीं, कातड्याचें काम, वेतांचे मुडे, खुर्च्या या सर्वांमध्यें तऱ्हेतऱ्हेचीं भारतीय अलंकरणें, अभिप्राय, सजावटी आणि आकृती यांचा उपयोग नेहमींच्या वापरण्याच्या वस्तूंमध्यें केलेला आम्हांला दिसून आला. ही भावी युगाची पूर्व-सूचना आहे. एके काळीं आमचा देश आमच्याच स्थानिक रूपांनीं आणि अलंकरणांनीं भरून गेलेला होता. परंतु विदेशी संस्कृतीनें येऊन त्यांचा नाश केला. आतां पुन्हां हळूहळू त्यांचा उद्धार करावा लागेल. आमचीं जलयानें आणि विमानें यांतून








बसविण्यांत येणारीं शय्यासनें (फर्निचर) जेव्हां धर्मचक्र, पूर्णघट, स्वस्तिक, कल्पवृक्ष, पद्मलता, पद्मभवन, हंसमिथुन, नंदिपद, अष्ट मांगलिक चिह्न वगैरे भारतीय रूपांची छाप घेऊन परदेशांत जातील, तेव्हां तीं भारतीय रूपें पाहून आपल्या-लाच नव्हे तर दूर देशांतून राहणाऱ्या आमच्या मित्रांनाहि अत्यंत आनंद होईल. जीवनाच्या दाही दिशांमध्यें मातृभूमीचा विस्तार याच मार्गानें होत असतो. ही महान् क्रांति घडवून आणणें हा भावी युगधर्म आहे. शांतिनिकेतनामध्यें चित्राचार्य नंदलाल यांची तेजस्वी साधना आणि तिनें प्रभावित झालेलें आश्रम-जीवन यांमध्यें या क्रांतीचें ओझरतें दर्शन घडल्यामुळें माझ्या मनाला मोठें समाधान झालें.

कलेंतील अर्वाचीन वादांच्या बाबतींतहि चित्राचार्य नंदलाल बसु यांचे विचार अगदीं स्पष्ट आहेत. त्यांनीं आपल्या देशाच्या कलापरंपरे-च्या निर्मल झऱ्यांचें अमृत-जल प्राशन केलेलें आहे. नव्या युगाला योग्य अशीं नवीं रूपेंहि त्यांनीं भारतीय परंपरांना दिलीं आहेत. भारतीय कलेचें मर्म न जाणतां जे चित्रकार क्षुद्र विदेशी वादांमागें धांवतात त्यांची मनोवृत्ति त्यांना आवडत नाहीं. जे लोक कलेवरील देशाची अथवा राष्ट्राची छाप मान्य करीत नाहींत आणि कला ही सार्वभौम आहे असें म्हणून राष्ट्रीय कलेचा उपहास करतात ते भ्रमांत आहेत, असें नंदलाल बाबूंना वाटतें. कलेचीं रूपें देश, प्रान्त, नगर आणि साधक यांच्या दृष्टीनें वेगवेगळीं व भिन्न भिन्न असतात, यांत मुळींच संशय नाहीं. तिबट, चीन, इराण, भारत यांच्या कलाविधींमध्यें त्यांचीं स्वतंत्र अशीं वैशिष्ट्यें आहेत. वेगवेगळ्या देशांत त्यांचा वेगवेगळा विकास आणि रूपविधान दिसून येतात. अर्थात्, कलेच्या मूर्त रूपांच्या मागें जो रस आहे तो एकच आहे; परंतु त्या रसाची अनुभूति देशभेदाप्रमाणें भिन्न भिन्न आहे. अनुभूति कलेच्या मूर्त रूपांमध्यें व्यक्त होत असते. विश्वात्म्याप्रमाणें रस हा सबंध विश्वांत एकच आहे. कला, काव्य आणि मानव यांच्यांतील सर्व भेदांना एकत्र गुंफणारें तें सूत्र आहे.

आमचे मित्र श्री. नीहार चौधरी यांनीं चित्राचार्य नंदलाल यांना त्यांच्या इकडे-तिकडे विखुरलेल्या चित्रांविषयीं माहिती विचारली. तेव्हां त्यांना उत्तर देतांना नंदलालबाबूंनीं सांगितलें कीं, त्यांचें 'महाप्रस्थान' हें चित्र श्री. अंबालाल साराभाई यांच्या संग्रहामध्यें, 'संघामित्रा' व 'बृहन्नला' हीं चित्रें श्री. कस्तूरभाई लालभाई यांच्या संग्रहांत, 'शोकार्त उमा' हें श्री. प्रफुल्लनाथ ठाकूर यांच्या संग्रहांत, 'द्यूतप्रसक्त युधिष्ठिर' हें कार्ल खंडालावाला यांच्या संग्रहामध्यें, 'पार्थ-सारथि' अवनीबाबूंजवळ, 'कुणाल' चिनू-भाईच्या संग्रहांत आणि 'पुरीच्या समुद्रकिनाऱ्यावर चैतन्य' हें त्रिवेंद्रमच्या चित्रालयम् या संग्रहांत आहे. कांहीं चित्रें श्री. काझिन्स, नाहर आणि कैलासवासी जे. अन्. रॉय, बॅरिस्टर (कलकत्ता) यांच्या संग्रहांत आहेत. परंतु त्यांच्या चित्रांचा एक विशिष्ट संग्रह अजून त्यांच्याजवळच आहे. 'अभिमन्युवध', 'नटीर पूजा' व 'गंगावतरण' हीं त्यांचीं तीन मोठीं चित्रें त्यांच्याजवळच आहेत. या महान् कलावंताच्या त्या भावनापूर्ण कलाकृती आहेत. बडोद्याच्या राजप्रासादांत 'गंगावतरणा' चें भव्य भित्ति-चित्र त्यांनीं काढलें होतें. 'अंधा बाउल', 'शिवसती', 'शिवाचें विषपान', 'विरहिणी राधा', 'प्रतीक्षा', 'चित्रांगदेच्या देशांत अर्जुन', 'ऋतुसंहार', 'देवदारु-वन' वगैरे त्यांच्या चित्रांचा माझ्या मनावर खूपच प्रभाव पडला.

या चित्रकाराचें व्यक्तित्व त्याच्या चित्रांपेक्षांहि महान् आहे अशी प्रचीति उराशीं बाळगून मीं त्यांचा निरोप घेतला. त्यांच्या अंतःकरणांतील अग्नीचे कांहीं थोडेसेच स्फुलिंग त्यांच्या चित्रांत येऊं शकले आहेत. बाकीचे त्यांच्या हृदयवेदीमध्यें आजहि धगधगत आहेत. खरोखरीं, शांतिनिकेतन-च्या वातावरणांत एका महान् निर्मात्याची विभूति वास करीत आहे. आश्रमाच्या प्रवेशद्वारीं लाल लाल फुलांनीं धगधगणाऱ्या पलाशवृक्षानें माझें स्वागत केलें त्याच क्षणीं मला गुरुदेवांचें मनोमन दर्शन घडलें होतें आणि तीन दिवसपर्यंत ते संस्कार निरंतर पुष्टच होत गेले.








प्रा. स. वा. कोगेकर

# टिळक, गोखले व समाज-कार्य

'नवभारता'च्या फेब्रुवारी १९५३ च्या अंकांत माझे मित्र प्रा. प्र. रा. दामले यांनीं **ना. गोपाळ कृष्ण गोखले** यांवर एक लेख लिहिलेला आहे त्यांत ओघानेंच ना. गोखले व लो. टिळक यांच्यांतील मतभेदांचा उल्लेख केलेला असून, डे. ए. सोसायटीच्या सभासदत्वाचा राजीनामा देतांना लो. टिळकांनीं घेतलेली भूमिका अधिक योग्य होती असें म्हटलें आहे. ही भूमिका प्रा. दामले यांच्याच शब्दांत "डे. ए. सो. च्या सभासदांनीं किमान वेतनावर संपूर्णतया आपणांस शिक्षणकार्यांत मिशनरी वृत्तीनें वाहून घेतलें पाहिजे व तसें झाल्यास सोसायटीचें शिक्षणकार्य पुष्कळ प्रकारें सुधारतां व वाढवितां येईल" अशी होती. "आतां पन्नास वर्षांनंतर या वादाचें निःपक्ष-बुद्धीनें निरीक्षण करणें शक्य आहे" असें म्हणून प्रा. दामले यांनीं यासंबंधीं आपलें मत व्यक्त केलें आहे. लो. टिळकांच्या राजीनाम्यांतील या तात्विक भूमिकेचें समर्थन अप्रत्यक्षपणें विरोधी पक्षांतील ना. गोखले यांनींच पुढें केलें असें, "प्रत्यक्ष गोखल्यांनीं स्वतः राष्ट्रकार्याचा प्रारंभ करण्यापूर्वीच स्वखुषीनें फर्ग्युसन कॉलेज सोडलें" यावरून प्रा. दामले म्हणतात. "गोखले याबावत टिळकांशीं भांडले असले तरी प्रत्यक्ष आचरणानें त्यांनीं टिळकांचीच भूमिका पत्करली" असें प्रा. दामले यांचें मत असून, त्यांचें इतरांनीं अनुकरण न केल्यामुळें महाराष्ट्राची हानि झाली असें त्यांस वाटतें.

प्रा. दामले यांच्या विचारसरणींतून माझ्या दृष्टीनें तीन मुद्दे पुढें येतात. त्यांपैकीं पहिले दोन हे केवळ ऐतिहासिक सत्य हुडकून काढण्यासंबंधीं असून, तिसरा शिक्षणकार्य व समाजकार्य यांच्या परस्परसंबंधाविषयींचा व अधिक व्यापक आहे. पहिले दोन मुद्दे असे : (१) लोकमान्य टिळकांनीं डे. ए. सोसायटींतून राजीनामा कोणत्या कारणासाठीं दिला. (२) ना. गोखले यांनीं राष्ट्रकार्यास आरंभ करण्यापूर्वीं फर्ग्युसन कॉलेज सोडलें काय ?

यांपैकीं पहिल्या मुद्द्याचा विचार करावयाला साधनभूत म्हणून टिळकांच्या दीर्घ, तपशीलवार राजीनाम्याकडे पाहिलें पाहिजे. हा राजीनामा डे. ए. सोसायटीच्या इतिहास-ग्रंथांत परिशिष्ट पान १ ते २९ मध्यें प्रसिद्ध केलेला आहे. त्याचें काळजीपूर्वक परिशीलन केल्यास, लो. टिळकांना सोसायटीच्या सभासदांनीं आपलें शिक्षणकार्य सोडून इतर बाहेरील कार्य करूं नये, असें म्हणावयाचें आहेसें दिसत नाहीं. टिळकांनीं जेझुइट मिशनरी संस्थांचा आदर्श आपल्यापुढें ठेवला होता. त्यांतील मुख्य कल्पना म्हणजे खासगी मिळकतीसाठीं संस्थेबाहेरील काम करण्यास परवानगी नसावी ही होय व त्यावरच टिळकांच्या राजीनाम्याचा सारा रोंख आहे. शिक्षणकार्य व सार्वजनिक कार्य यांची फारकत केली पाहिजे व शिक्षणकार्यांत पडलेल्या मंडळींनीं सामाजिक कार्यापासून अलिप्त राहिलें पाहिजे असें म्हणण्याचा त्यांचा उद्देश नव्हता. त्यांच्या स्वतःच्याच कार्यावरून पाहतां याच विचारसरणीला पुष्टि मिळते. 'केसरी' व 'मराठा' हीं वृत्तपत्रें डे. ए. सोसायटीचे सभासदच सुरुवातीला चालवीत होते. राजीनाम्यांत टिळक म्हणतात : "हीं पत्रें चालविण्याचें कार्य संस्थेच्या मुख्य उद्देशाला पोषक आहे, असें म्हणून आपण या कार्याचें १८८२ च्या अहवालांत समर्थन केलें. ही भूमिका आपण घेऊं शकलों याचें कारण त्या वेळीं चालू असलेल्या या बाहेरील कार्यांत संस्था म्हणून आपण सर्व सहभागी होतों......पण पुढें जेव्हां बाहेरील काम केवळ वैयक्तिक फायद्याकरितां घेण्यांत येऊं लागलें तेव्हां मतभेदांना सुरुवात झाली."[1] केसरी मराठा पत्रांना

---

१. 'डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा इतिहास', 'राजीनामा', पान ६.







न्यू इंग्लिश स्कूलमधून मिळणाऱ्या मदतीवर सुरुवातीला अवलंबून राहावें लागत होतें ही गोष्टहि प्रसिद्धच आहे. वृत्तपत्रें बंद करावींत असा विचार पुढें आला असतां खुद्द टिळकांनींच त्याला विरोध केला. " आपण सुरू केलेला उद्योग—विशेषतः मराठी पत्र इतकें यशस्वी आणि लोकप्रिय झालें असतांना—बंद करण्यास माझा विरोध होता".[२] तेव्हां संस्थेला संमत असलेल्या सार्वजनिक कार्याला टिळकांचा विरोध नव्हता; खासगी फायद्यासाठीं करावयाच्या कामाला तो विरोध होता, असें दिसतें. त्यामुळें निर्माण होणाऱ्या अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं देखील टिळकांनीं दोन पर्याय सुचविले होते. एक म्हणजे हें काम अजीबात सोडून देणें किंवा त्यांत मिळणारा फायदा मिशनरी संस्थांतील पद्धतीप्रमाणें संस्थेला देऊन टाकणें.[३] म्हणजे बाहेरचें कामच करूं नये, असाहि त्यांचा कटाक्ष दिसत नाहीं.

पण याच राजीनामा-प्रकरणीं टिळकांनीं गोखल्यांच्या सर्वजनिक सभेच्या चिटणिसाच्या कामाला विरोध दर्शविला होता हें कसें?—असा प्रश्न साहजिकच पुढें येतो आणि त्याला पक्षभेदाशिवाय अन्य असें समर्पक कारण सांपडत नाहीं. दररोज दोन-तीन तास काम या प्रकारें करणें आणि संस्थेच्या बाहेर याप्रमाणें ठराविकपणें बांधून घेणें ही गोष्ट टिळकांच्या मतें आक्षेपार्ह होती. परंतु टिळकांनीं स्वतः जें सार्वजनिक कार्य अंगावर घेतलें त्याला हेच आक्षेप लागू केल्यावर त्यांचें जें समर्थन टिळकांनीं केलें, तें समाधानकारक वाटत नाहीं. १८८९ सालीं टिळकांनीं काँग्रेसचें कार्य हातीं घेतलें, तसेंच क्रॉफर्ड-प्रकरणीं मामलेदार लोकांच्या वतीनें चळवळ केली. या कामांसंबंधीं टिळक म्हणतात कीं, " ( १ ) हीं कामें तात्पुरत्या स्वरूपाचीं होतीं ( म्हणजेच गोखल्यांच्या सार्वजनिक सभेंतील कामाप्रमाणें बांधून टाकणारीं नव्हतीं. ). ( २ ) काँग्रेसचें काम मी रजेवर असतांना घेतलें व त्या वेळीं संस्थेंतून निवृत्त होण्याचे विचार माझ्या मनांत चालू होते. पुढें रजा संपून मी परत आलों तरी तें काम चालूंच ठेवलें. कारण आपसांतील मतभेद कायमचे मिटले असें मी समजत नव्हतों. ( ३ ) छापखान्याचें काम सुरुवातीस सर्वोचेंच होतें. पुढें तें तसें राहिलें नसलें तरी मला त्यांत पडण्याची स्पष्ट परवानगी देण्यांत आलेली होती. ( ४ ) इतकें असलें तरी सार्वजनिक सभेचें काम मात्र आपण रजेवर असतांना देखील घेतलें नाहीं. कारण संस्थेंतून निवृत्त होण्याचा विचार नक्की ठरला नव्हता. " पण हा सर्व बचाव तर्कदृष्ट्या समाधानकारक नाहीं याची जाणीव टिळकांनाहि असावी, असें दिसतें. तात्पुरत्या स्वरूपाचीं एकामागून एक अशीं अनेक कामें करण्यास हरकत नाहीं, पण एकच काम सातत्यानें केलें कीं चुकलें, असा हा युक्तिवाद कसा टिकणार? म्हणूनच टिळक शेवटीं म्हणतात : ' इतकें असूनहि जर माझ्यावर ठपका ठेवणार असाल तर माझ्या निःस्वार्थी कार्याबद्दल ही अशी संभावना व्हावी हें माझें दुर्भाग्य समजलें पाहिजे.'[४] म्हणजे टिळकांचा मुख्य रोख स्वार्थी वृत्तीनें केलेल्या कामावर होता हेंच पुनः दिसतें. पण गोखल्यांनीं सार्वजनिक सभेंतील कार्य स्वार्थी वृत्तीनें अंगावर घेतलें होतें असें म्हणण्यांत काय अर्थ आहे?

राजीनाम्याचा व त्या वेळच्या मतभेदांचा सूक्ष्म अभ्यास केल्यावर जी गोष्ट मनावर प्रामुख्यानें बिंबते ती ही कीं, जरी टिळक आणि त्यांचे सहकारी यांच्यांत मतभेद होते तरी ते शिक्षणकार्य व सार्वजनिक कार्य यांच्यांतील फारकतीच्या मुद्द्यावर नव्हते. तात्यासाहेब केळकरांनीं ' टिळकचरित्रां 'त या प्रकरणीं जो निष्कर्ष काढला आहे तोच योग्य वाटतो. तो असा : " तत्त्वापेक्षां व्यक्तिविषयक कुरबुरीमुळेंच सोसायटींतील एकी नष्ट होऊन टिळकांना राजीनामा द्यावा लागला. "[५] खुद्द प्रा. दामले यांनीं देखील आपल्या लेखांत एके ठिकाणीं ही गोष्ट मान्य केलेली दिसते. ते म्हणतात :

---

२. कित्ता, पान ११.    ३. कित्ता, पान १४    ४. कित्ता, पान २७.

५. ' लो. टिळक यांचें चरित्र ' खंड १. पान २१६








अनुक्रमणिका

" कदाचित् गोखले, आगरकर यांचें राजकारण व समाजकारण टिळकांस पसंत असतें तर त्यांच्यांतील मतभेद इतका विकोपास गेला नसता ! " मग असें असतां टिळक व गोखले या " दोघांसहि सार्वजनिक कार्यात पुढाकार घेण्यापूर्वी शिक्षणक्षेत्र सोडावें लागलें " असें प्रतिपादिण्यांत काय अर्थ आहे ? खुद्द टिळकांनीं संस्थेंतील शिक्षणकार्य करीत असतांसुद्धां इतर सार्वजनिक कार्य केलें. याविषयीं अधिक विस्तारांत न जातां फक्त एकाच गोष्टीचा उल्लेख केला म्हणजे पुरें. १८८९ सालीं ( म्हणजे राजीनाम्याच्या आदल्या वर्षी ) पुण्यांत कॉंग्रेसचें अधिवेशन भरावें म्हणून खटपट चालू होती. तिचा एक भाग म्हणून या कामीं मुंबईकरांचें मन वळविण्यासाठीं पुणेकरांची वकिली करण्याचें कार्य लो. टिळक व सोसायटींतील त्यांचे एक सहकारी श्री. माधवराव नामजोशी यांजकडे आलें. या प्रसंगाला उद्देशून तात्यासाहेब केळकर लिहितात : " वरील गोष्टीवरून हें दिसून येईल कीं, रा. ब. रानडे वगळले असतां पुण्याचें राजकीय बाबतींतलें पुढारीपण टिळकांकडेच येऊन राहिलें होतें. मात्र त्यांच्या जोडीला माधवराव नामजोशी यांचाहि निर्देश केला पाहिजे. "[६] टिळकांनीं कॉंग्रेसचें काम रजेच्या मुदतींत अंगावर घेतलें असेल; पण तोंपर्यंतच्या कालांत केवळ शैक्षणिक कार्य करून राजकीय बाबतींतलें पुढारीपण त्यांच्याकडे येऊन राहिलें होतें, असें तर प्रा. दामले यांना सुचवावयाचें नाहीं ना ?

आतां दुसऱ्या मुद्द्याकडे वळूं. प्रा. दामले यांच्या मतें ना. गोखले यांनीं राष्ट्रकार्यास प्रारंभ करण्यापूर्वी स्वखुषीनें फर्ग्युसन कॉलेज सोडलें. हें विधान ऐतिहासिक दृष्ट्या बरोबर आहे काय ? पण याचें उत्तर विस्तारानें देण्याचें कारण नाहीं. ना. शास्त्रीकृत ' गोखल्यांच्या चरित्रा 'च्या परिशिष्टांत त्यांच्या आयुष्यांतील ठळक गोष्टींची एक जंत्री दिलेली आहे. तिच्याकडे नजर टाकतांच ऐतिहासिक दृष्ट्या प्रा. दामले यांचें विधान बरोबर नाहीं असें कोणीहि म्हणेल. गोखले १८८६ सालीं आजीव सभासद म्हणून सोसायटींत दाखल झाले. त्याच सालीं कोल्हापूरला त्यांचें पहिलें जाहीर भाषण झालें. पुढें १८८८ सालीं ' सुधारका 'च्या इंग्रजी विभागाचें संपादकत्व, सार्वजनिक सभेची चिटणिशी व सभेच्या त्रैमासिकाचें संपादकत्व त्यांनीं अंगावर घेतलें. १८८९ पासून त्यांनीं राष्ट्रीय कार्यांत भाग घेण्यास सुरुवात केली. १८९३ सालीं ते मुंबई प्रांतिक परिषदेचे चिटणीस होते. १८९५ मध्यें राष्ट्रीय सभेचे सहचिटणीस होते. १८९७ मध्यें ' वेल्बी कमिशन 'समोर साक्ष देण्यासाठीं विलायतेची वारी. १८९८ प्लेगनिवारणकार्यांत मदत. १८९९ सालीं मुंबई कायदेकौन्सिलांत निवड. १९०२ मध्यें सोसायटींतून निवृत्ति व त्याच सालीं मध्यवर्ती कायदेकौन्सिलांत निवड,—या त्रोटक उल्लेखांवरून देखील असें दिसून येईल कीं, राष्ट्रकार्यास प्रारंभ करण्यासाठीं १९०२ पर्यंत ना. गोखले थांबलेले नव्हते. अर्थात्, वादासाठीं टिळकांनीं पुढें मांडलेला मुद्दा प्रा. दामले म्हणतात तसा होता असें गृहीत धरलें तरीहि, गोखल्यांनीं प्रत्यक्ष आचरणानें त्यांस पाठिंबा दिला असें म्हणतां येणार नाहीं.

तेव्हां केवळ ऐतिहासिक घडामोडी म्हणून पाहातां टिळक व गोखले यांच्या कार्यासंबंधीं व विचारसरणीसंबंधीं प्रा. दामले यांनीं केलेलीं विधानें मान्य होण्यासारखीं नसलीं तरी शिक्षणविषयक एक प्रश्न म्हणून त्यांचा आणखी विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

शिक्षण-संशोधन हीं कामें करणें व सार्वजनिक जीवनांत भाग घेणें या गोष्टी परस्परविरोधी आहेत काय ? सार्वजनिक कार्य व राजकारण यांत प्रा. दामले फारसा फरक करीत नाहींत आणि राजकारण हा सार्वजनिक कार्याचा एक प्रमुख भाग असल्यामुळें तसा तो केलाच पाहिजे, असा माझा आग्रहहि नाहीं. परंतु अशीं कित्येक कामें दाखवितां येतील कीं, त्यांत राजकारणाचा प्रत्यक्ष शिरकाव होण्याचें कारण नाहीं. अशीं कामेंहि प्रा. दामले यांच्या मतें राजकारणाप्रमाणेंच अध्यापकांनीं त्याज्य समजलीं पाहिजेत कीं काय हा एक गौण मुद्दा विचारांत घेण्यासारखा आहे. परंतु

६. कित्ता, पान २१७








## टिळक, गोखले व समाजकार्य

प्रस्तुत लेखांत प्रा. दामले यांनीं पुढें मांडलेल्या विचारसरणीचाच प्रामुख्यानें विचार केला आहे. टिळक व गोखले या दोघांसहि " सार्वजनिक कार्यांत पुढाकार घेण्यापूर्वी शिक्षणक्षेत्र सोडावें लागलें " असें म्हणून प्रा. दामले पुढें लिहितात: " त्याचें कारण स्पष्ट आहे. तें असें कीं, राजकारण (—पण वरील वाक्यांत 'सार्वजनिक कार्य' असा स्थूल शब्दप्रयोग आहे.—) व शिक्षण-संशोधन हीं दोन्हींहि पूर्ण वेळ व शक्ति देण्याचीं कामें झालीं आहेत व तीं तशींच केलीं गेलीं तरच त्यांस तेजस्विता प्राप्त होते...तत्त्वतः त्यामुळें उच्च शिक्षण-संशोधनाच्या कार्यांत व्यग्रता येते, हें नाकबूल करतां येणार नाहीं. "

वरील विधानावरून मनांत पाहिला विचार असा येतो कीं, राजकारण हें पूर्ण वेळ व शक्ति देण्याचें काम ठरल्यास ज्यांना आपल्या उपजीविकेसाठीं अन्य कांहीं करावें लागत नाहीं अशाच लोकांनीं राजकारणांत पडलें पाहिजे. कारण राजकारण हें कांहीं थोड्या व्यक्ती सोडल्या तर अजून तरी उपजीविकेचें साधन झालेलें दिसत नाहीं. आजच्या लोकशाहीच्या काळांत अशा प्रकारें सुखवस्तू लोकांनींच राजकारण करावें ही विचारसरणी कितपत सुसंगत आहे? उलट, प्रत्येक नागरिकाच्या जीवनावर परिणाम करणारे निर्णय राजकारणांत घेतले जात असल्यामुळें, प्रत्येकास त्यांत भाग घेतां आला पाहिजे, असा लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांचा दावा आहे. ज्या प्रमाणांत राजकारण ही कांहीं विशिष्ट लोकांची मक्तेदारी बनते, त्या प्रमाणांत लोकशाहीची पिछेहाट झाली, असेंहि मानलें जातें. मग या गोष्टींचा आणि प्रा. दामले यांच्या विधानाचा मेळ कसा घालावयाचा? वास्तविक पाहातां राजकारण म्हणजे अमुक एक विशिष्ट गोष्ट असें नाहीं. त्यांत अनेक प्रकार, अनेक टप्पे, अनेक पायऱ्या आहेत. दैनंदिन घडामोडींची माहिती करून घेण्यापासून तों कायदेमंडळांत सभासद अगर सरकारांत मंत्री होण्यापर्यंत किती तरी गोष्टी राजकारणांत मोडतात. असें असतां सारेंच राजकारण हें पूर्ण वेळ व शक्ति देण्याचें काम कसें मानतां येईल? कांहीं व्यक्तींना राजकारणांत सारा वेळ व शक्ति खर्चीं घालावी लागेल; पण सर्वांनाच तसें करण्याचें कारण नाहीं. गांवांतील म्युनिसिपालिटींत डॉक्टर, वकील, शिक्षक, प्राध्यापक, व्यापारी, दुकानदार, कारकून, मजूर या साऱ्यांना काम करणें शक्य असतें. किंबहुना, तसें तें शक्य असावें असें आपण म्हणतों. हें काम पूर्ण वेळ व शक्ति देण्याचें असेल तर वरीलपैकीं किती जणांस त्यांत भाग घेतां येईल? आणि हें राजकारणाबाहेरचें काम आहे काय? तेव्हां प्रा. दामले यांनीं राजकारणासंबंधीं जी कल्पना करून घेऊन आपलें विधान केलें आहे ती कल्पना बरोबर नाहीं, असें म्हणावें लागतें.

प्रा. दामले यांच्या मतें राजकारण किंवा शिक्षण-संशोधन हीं कामें पूर्ण वेळ व शक्ति देऊन केलीं तरच त्यांस तेजस्विता प्राप्त होते. परंतु हें तरी वस्तुस्थितीला धरून आहे काय? शिक्षण-संशोधनापासून आपण काय अपेक्षा करतों? ज्ञान-प्रसार व ज्ञानसंवर्धन या गोष्टी तर त्यांत अंतर्भूत आहेतच; पण समाजाला पोषक, प्रगतिपर असें तें ज्ञान व्हावयाचें असल्यास फक्त आपल्या मठींत बसून शिक्षक-संशोधकाला भागणार नाहीं. एक काळ असा होता कीं, समाजशास्त्रें सोडून इतर प्रकारच्या शास्त्रांच्या संशोधकांना केवळ आपल्यास आवश्यक ती साधनसामग्री मिळविण्यापलीकडे समाजाशीं संबंध ठेवला नाहीं तरी चालत असे. परंतु आज ती गोष्ट देखील शक्य नाहीं. कारण या शास्त्रांच्या संशोधनक्षेत्रांतहि राजकारणानें प्रवेश केला आहे. अणु-संशोधनासारख्या शाखेंत कार्य करणारे प्रथितयश शास्त्रज्ञ आज राजकारणांत भाग घेऊं लागले आहेत. आणि समाजशास्त्रज्ञांच्या बाबतींत तर बोलावयालाच नको. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र या शाखांत विशेष मौलिक भर टाकणाऱ्या पाश्चात्त्य शास्त्रज्ञांकडे पाहिल्यास ज्यांना प्रत्यक्ष समाजकार्यांत अनुभव मिळालेला आहे अशांनींच शास्त्राच्या वाढीस हातभार लावलेला दिसतो आणि तें अगदीं स्वाभाविक आहे. ज्या सामाजिक घडामोडींचा अन्वयार्थ शास्त्रज्ञ लावणार त्यांची सखोल माहिती आणि त्यांत वावरणाऱ्या अंतः








प्रवृत्तींचें अनुभवजन्य ज्ञान त्यांस असलें तरच त्यांच्या विचारांस तेजस्विता येईल. एरवीं नुसतें पांडित्य-प्रदर्शन होईल, पण ज्ञानांत मौलिक भर पडणार नाहीं. आपल्या देशांत समाजशास्त्रांची आज जी केविलवाणी अवस्था आहे त्याचें एक प्रमुख कारण म्हणजे या शास्त्रांत काम करणाऱ्या शिक्षकांना आणि संशोधकांना प्रत्यक्ष समाज-कार्याचा अनुभव अत्यल्प, जवळजवळ नाहींच, असें म्हटलें तरी चालेल. या शाखांतील संशो-धनहि बहुंशीं पुस्तकी आणि परप्रत्ययनेय अशा प्रकारचें आहे. त्यांत जिवंतपणा फार थोडा आहे. आज समाजशास्त्रांतील संशोधकांच्या मार्गांतील मुख्य अडचण समाजकार्य नव्हे, तर अध्यापन-कार्य हें ठरूं पाहात आहे. हें विधान चमत्कारिक वाटलें तरी यथार्थ आहे.[७] तेव्हां राजकारणाप्रमाणें शिक्षण-संशोधनाच्या कार्यासंबंधींच्या प्रा. दामले यांच्या कल्पना आजच्या परिस्थितीशीं जुळणाऱ्या नाहींत, असें म्हणावेसें वाटतें.[८]

दुसरा असा विचार मनांत येतो कीं, इतर स्वतंत्र देशांत याप्रमाणें समाजकार्य एका बाजूला आणि शिक्षण संशोधन कार्य दुसऱ्या बाजूला असें कां पाहिलें जात नाहीं ? राजकारणांत कोणीं किती मर्यादेपर्यंत पडावयाचें हा ज्या त्या व्यक्तीचा वैयक्तिक प्रश्न आहे, अशा भूमिकेवरूनच या प्रश्नाकडे बघितलें जातें. ज्याला अध्ययन–अध्यापन-संशोधनांत गोडी आहे तो आपला बराचसा वेळ त्या कामीं देईलच. पण फावल्या वेळीं त्यानें अमुकच केलें पाहिजे, अमुकच न केलें पाहिजे असें बंधन घालण्याचें कारण काय ? फावल्या वेळीं पत्ते खेळणारा संशोधक हा त्याऐवजीं प्रचलित राज-कारणावर आपलीं मतें सांगून लोकांचें मार्गदर्शन करण्यासाठीं व्याख्यानें देणाऱ्या संशोधकापेक्षां श्रेष्ठ कां व कसा ठरवावयाचा ? आपल्याकडे या प्रश्नाला ही जी कलाटणी मिळाली आहे त्याचें कारण आपल्या आजवरच्या विकृत राजकीय जीवनांत सांपडतें. परकीय अंमलाखालील लोकांना या ना त्या प्रकारें राजकीय चळवळीपासून अलिप्त ठेवण्यासाठीं शिक्षण आणि राजकारण यांतील विरोध जसा राज्यकर्त्यांनीं फुगविला, त्याप्रमाणेंच १९२० नंतरच्या असहकाराच्या युगांतील सर्वग्रासी राजकारणामुळेंहि या विरोधाला पुष्टि मिळाली. पण आतां स्वतंत्र भारतांतील समाजजीवनांत हरएक प्रकारचीं विधायक कार्यें पुढें उभीं असतां आणि सर्व लोकांच्या स्वयंस्फूर्त सहकार्यास सर्वत्र आवाहन केलें जात असतां आम्हीं पूर्वींच्याच संकुचित कल्पनांचे देव्हारे माजवावेत, याचें आश्चर्य वाटल्या-शिवाय राहत नाहीं. प्रस्तुत लेखक बी. ए. च्या वर्गांत असतां एका प्रसंगीं प्रा. वामनराव काळे यांनीं काढलेले उद्‌गार या ठिकाणीं सहज मनांत येतात. ते म्हणाले होते कीं, “परतंत्र देशांतील अर्थशास्त्रज्ञांना प्रत्यक्ष सामाजिक आणि आर्थिक घडामोडींचें ज्ञान होण्याच्या मार्गांत अनंत अड-चणी उभ्या राहतात. उदाहरणार्थ, कोठलीहि चौकशीकमिटी असो, कमिशन असो, तीवर हिंदी लोकांपेक्षां गोरे लोकच सरकार नेमतें आणि अशा प्रकारें जमा होणारी माहिती आणि अनुभव गोऱ्या लोकांबरोबरच येथून निघून जातात. पुनः आम्ही कोरडे ते कोरडेच ! शिवाय, अनुभव नसल्यामुळें आम्हांला निरुपयोगी म्हणून ठर-विण्यांत येतें तें निराळेंच.” आज तो मनु पालटला आहे, तर आम्हीच काल्पनिक अडचणी उभ्या करून स्वतःला जनताविमुख बनवूं पाहातों. अर्थात्, माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रत्येक शिक्षकानें व संशोधकानें समाजकार्यांत प्रामुख्यानें भाग घेतलाच पाहिजे. परंतु तो जर कोणीं घेतला तर शिक्षण-संशोधनकार्याची हानि झाली असें

---

७. या विषयावर ‘युनिव्हर्सिटीज् कार्टर्ली’ या त्रैमासिकाच्या नोव्हेंबर १९५२ च्या अंकांतील श्रीमती बार्बारा वुटन यांचा ‘Why I resigned my Professorship ?’ हा लेख वाचण्या-सारखा आहे.

८. याच विषयाला अनुलक्षून लिहिलेला माझा ‘नवभारत’ सप्टेंबर १९५१ च्या अंकांतील ‘अध्यापकांचें स्वातंत्र्य’ हा लेख जिज्ञासूंनीं पाहावा.










मानण्याचें कारण नाहीं. सरकारी नोकरींतील अध्यापकांना, राजकारणाचेंच काय पण गणपति-उत्सवाचें देखील पूर्वीच्या काळीं वावडें असे. पण या कारणामुळेंच त्यांच्या हातून शिक्षण-संशोधनाचें कार्य अधिक चांगलें झालें आहे असें कोण म्हणूं शकेल? म्हणून शिक्षण-संशोधन आणि सार्वजनिक कार्य यांत प्रा. दामले यांनीं जी फारकत केली आहे ती करण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं.

---

काव्यसंग्रहांचें परीक्षण : प्रा. गो. म. कुलकर्णी

# आजच्या मराठी काव्यांतील भिन्नभिन्न प्रवाह

सुमारें आठ-दहा वर्षांपूर्वीं 'मराठी काव्याला ओहोटी लागली आहे काय?' या प्रश्नाची चर्चा मोठ्या अटीतटीनें केली जात असे. ओहोटीच्या कारणमीमांसेबाबत मतभेद असले तरी मराठी कवितेचा प्रवाह कुंठित झाला आहे, याबाबत दुमत नव्हतें. सुदैवानें ही स्थिति आतां पालटली आहे. गेल्या पांच-सहा वर्षांपासून मराठी कवितेला एक नवें उधाण आलेलें दिसतें. नवे नवे कवी व त्यांचे काव्यसंग्रह रसिकांच्या समोर सतत येत आहेत. नवकाव्यानें तर एक अगदीं वेगळा प्रवाह मराठी काव्यसरितेच्या ओघांत आणून सोडला आहे. तो गढूळ आहे असें जरी क्षणभर मान्य केलें, तरी त्यानें एकंदर मराठी कवितेला एक नवें वळण लागण्याचा संभव आहे, हें मान्य केलें पाहिजे. निदान मध्यंतरींच्या काळांत रुद्ध झालेली काव्य-सरिता पुन्हां प्रवाही करण्याचें श्रेय नवकाव्याला देण्यास हरकत नसावी.

नवकाव्य हा आजच्या काळांतील प्रमुख प्रवाह असला तरी 'जुनें' काव्य त्यानें लुप्त झालेलें नाहीं. समाजमनांत आज जें नव्या-जुन्या वृत्तींचें मिश्रण आढळतें त्याचें प्रतिबिंब वाङ्मयांत पडलेलें आढळलें तर त्यांत नवल नाहीं. १९५०-५१ सालीं वर्ष-सहामाहीच्या अंतरानें प्रसिद्ध झालेले 'आनंदभैरवी', 'हळवें भिंग', 'छिन्नध्वज' व 'जयजयवंती' हे संग्रह थोडेसे चाळून पाहिलें तरी या वृत्तिभिन्नत्वाचा प्रत्यय येतो. यांतील प्रत्येक कवीची बैठक तर वेगवेगळी आहेच, पण कांहीं वेळां ती परस्परविरोधी असल्याचेंहि दिसतें.

प्रा. य. द. भावे यांचें 'हळवें भिंग' व श्री. बोरकर यांची 'आनंदभैरवी' यांची बरवर तुलना केली तरी त्यांच्या भूमिकांतील हा विरोध स्पष्ट होतो. 'अत्याधुनिक आंग्लकवीं'चा मुख्यत्वें-करून आपल्या काव्यावर परिणाम झाला आहे असें भावे म्हणतात, तर बोरकर उद्गारतात :
'मुनी विनोबा, कवि ज्ञानेश्वर, योगी मोहनदास।
त्रिविध त्यांचिया मुद्रांमधुनि प्यालों ब्रह्मविलास'

---

(१) 'आनंद-भैरवी'—बा. भ. बोरकर. प्रकाशक : पां. रा. ढमढेरे, पुणें २. (१९५०) पृष्ठें १०१. किंमत २॥ रुपये.

(२) 'हळवें भिंग'—प्रा. य. द. भावे. प्रकाशक : मधुकर वि. पै., बेळगांव, (१९५१) पृष्ठें ८०, किंमत १॥ रुपये.

(३) 'छिन्नध्वज'—'शरद्', अजित-प्रकाशन, बेळगांव (१९५१), पृष्ठें १०३, किंमत २॥ रुपये.

(४) 'जयजयवंती'—लेखक व प्रकाशक : मा. गो. काटकर, ५२१ शुक्रवार, सोलापूर, (१९५१), पृष्ठें ९०, किंमत २॥ रुपये.








नवकाव्याचा जोरदार पुरस्कार भावे यांनीं केला आहे. हा प्रकार त्यांना सर्वस्वीं स्वागतार्ह वाटतो. तर 'कमळें तुडवुनि गाळ चिवडिते नवी युगंधर आमुची कविता' असा तिच्यावर बोरकर आक्षेप घेतात. आधुनिक यंत्रयुगाच्या चित्रणावर भावे यांचा भर आहे तर जुन्या आध्यात्मिक परंपरेचे पडसाद बोरकरांच्या काव्यांत अधिक उमटले आहेत. भाव्यांच्या काव्यांत शंटिंग, पिस्टन, छापयंत्र, फ्यूज, क्ष-किरणें इत्यादि शब्दांचा भरणा अधिक, तर बोरकरांच्या कवितेंत सायुज्य, ॐकार, प्रणव, अथर्वमंत्र, श्रेय, प्रेय यांसारख्या शब्दांचा आढळ ठिकठिकाणीं होतो. 'छिन्नध्वज' व 'जयजयवंती' या संग्रहांच्या कर्त्यांच्या भूमिका इतक्या विरोधी नसल्या तरी आपापल्या परीनें वेगळ्या आहेतच. 'छिन्नध्वजा'चा उगम शाहिरी परंपरेंतून झालेला आढळतो तर 'जयजयवंती'वर 'रविकिरणमंडळा'ची छाया असलेली दिसते. श्री. भावे व शरद् यांनीं आपापल्या काव्यविषयक भूमिका स्वतःच मांडल्या असून, श्री. दि. के. बेडेकरांच्या प्रस्तावनेच्या द्वारां 'जयजयवंती'च्या कर्त्याची भूमिका स्पष्ट झाली आहे. श्री. बोरकरांच्या संग्रहाला मात्र प्रस्तावना नाहीं. शरद् व काटकर यांचा हा पहिलाच संग्रह असल्यामुळें त्यांनीं प्रस्तावनाकारांचा आश्रय घेतलेला दिसतो. य. द. भावे यांचा हा दुसरा संग्रह असला तरी ज्या प्रकारचें नवकाव्य ते लिहितात त्याविषयीं बरेच गैरसमज असल्यामुळें त्यांनीं या काव्याचें स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं विस्तृत प्रस्तावना लिहिलेली दिसते. बोरकरांचा हा चौथा काव्यसंग्रह असल्यामुळें व काव्यविषयक भूमिकेंत बदल झालेला नसल्यामुळें त्यांना प्रस्तावनेची जरूरी वाटली नसावी. इतर सर्वच प्रस्तावना वाचनीय असून काव्यविषयक अनेक विवाद्य मुद्द्यांची चर्चा त्यांत आली आहे. श्री. बेडेकरांनीं 'जयजयवंती'च्या प्रस्तावनेंत आजच्या कवींचा युगधर्म कोणता यावर विशेष भर दिला असून, 'छिन्नध्वज'-कर्त्यांनीं आपली मानवतावादाची भूमिका स्पष्ट केली आहे.

'हळवें भिंग'

या सर्व प्रस्तावनांत सर्वांत विवाद्य अशी कोणाची प्रस्तावना झाली असेल तर ती य. द. भावे यांची. नवकवितेविषयींचे कांहीं गैरसमज दूर करण्याच्या दृष्टीनें ती उपयुक्त झाली आहे. पण नवकाव्याच्या समर्थनाच्या भरांत त्यांनीं जे कांहीं नवीन सिद्धान्त मांडले आहेत, ते अतिशय विवाद्य असे असून, क्वचित् जुन्या कवींविषयीं गैरसमज निर्माण करणारेहि आहेत. प्रस्तावनेच्या पृष्ठ २ वर ते म्हणतात : "जुन्या कवींच्या वास्तवाबद्दलच्या कल्पना संकुचित नसल्या तरी अपुऱ्या असतात. इतकेंच नव्हे तर, अंतिम वास्तवाचें स्वरूप समजून घेतांना ते आपल्या कविव्यक्तिमत्त्वा-( Poetic Personality ) चा अर्धामुर्धा भागच उपयोगांत आणतात...त्या मानानें नवकवीचा मागोवा हा पूर्ण असतो. कारण त्याच्या वास्तवाबद्दलच्या कल्पना गतिमान् ( dynamic ), क्रांतिकारक, पुरोगामी व शास्त्रीय असतात..." आहे या स्वरूपांत हा सिद्धान्त काव्यापुरताच मर्यादित न राहतां सर्वच कलांना, शास्त्रांना व विद्यांना लागू होण्यासारखा आहे. या सिद्धान्ताप्रमाणें मागील सर्वच कलावंतांचा, शास्त्रज्ञांचा व तत्त्ववेत्त्यांचा वास्तवाचा मागोवा आजच्या कलावंतांपेक्षां, शास्त्रज्ञांपेक्षां व तत्त्ववेत्त्यांपेक्षां 'अपुरा' होता असें मानावें लागेल. वास्तवाचें स्वरूप समजून घेण्याचीं साधनें पूर्वीपेक्षां आतां वाढलेलीं आहेत हें खरें; पण एवढ्याच गोष्टीच्या आधारें आजचा कलावंत, शास्त्रज्ञ वा तत्त्ववेत्ता पूर्वसूरींहून श्रेष्ठ ठरत नाहीं. काव्याच्या क्षेत्रांत तर केवळ विज्ञानाच्या साहाय्यानें वास्तवाचें केलेलें बौद्धिक आकलन अपुरें ठरतें. एवढ्याच भांडवलावर जर श्रेष्ठ कवि होतां आलें असतें तर आजचा कोणताहि विज्ञानाचा विद्यार्थी सर्व प्राचीन कवींहून श्रेष्ठ ठरला असता !

प्रा. भावे यांनाहि हा सिद्धान्त अपुरा वाटत असल्यामुळें त्यांनीं त्याला अप्रकट मनाची पुस्ती जोडली आहे. जागृत मनानें वास्तवाचें रूप टिपून घेतांना आलेला अनुभव आणि अर्धसुप्त वा सुप्त मनाला जागें करून आलेला अव्यक्ताचा अनुभव या दोन प्रेरणांचा परिणामदर्शक ('रिझल्टंट ऑफ








फोर्सिस् ' ) वास्तवाचें जास्तींत जास्त यथातथ्य स्वरूप दाखवितो, असें त्यांचें म्हणणें. परंतु प्रकट मनानें केलेल्या वास्तवाच्या ग्रहणाचा अप्रकट मनावर परिणाम होत असल्यानें व अप्रकट मनांत कांहीं वेळां विकृति असण्याचा संभव असल्यानें, प्रकट-अप्रकट मनाच्या प्रेरणांचा भावे म्हणतात तसा परिणामदर्शक काढूनहि, त्यायोगें वास्तवाचें ' जास्तींत जास्त यथातथ्य स्वरूप ' समजेलच, असें नाहीं. जुना कवि व्यक्तिमत्त्वाचा अर्धामुर्धा भागच उपयोगांत आणतो हा मुद्दाहि असाच विवाद्य आहे. जुना कवि नव्यापेक्षां वेगळ्या तऱ्हेनें आपल्या व्यक्तित्वाचा आविष्कार करतो हें म्हणणें वेगळें व तो आपलें व्यक्तित्व अर्धेमुर्धेंच व्यक्त करतो हें म्हणणें वेगळें. अर्ध्यामुर्ध्या व्यक्तित्वाच्या आविष्कारानें चांगलें काव्य निर्माण होईल कीं काय हा प्रश्नच आहे. नवकवि हा क्रांतिकारक, पुरोगामी वगैरे असतो हें विधानहि अतिव्याप्त आहे. सर्वच नवकवींच्या काव्याचा आशय पुरोगामी असल्याचा प्रत्यय आजचें नवकाव्य वाचून येत नाहीं. नवकवींचे अध्वर्यु श्री. मर्ढेकर यांच्या

" नळींतलें जग नळींत जगतें,
उगाच रुसवा रसायनाचा :
उगाच दावा मानवतेचा
आणिक डंका सामर्थ्याचा ! "

यांसारख्या ओळींत कोणता पुरोगामी आशय भरलेला आहे हें समजणें कठीण आहे. " नवकवि हा सौंदर्याचा, मांगल्याचा व सृजकतेचा मौलिक भक्त असतो " हेंहि आवर्जून सांगण्याचें येथें कारण नव्हतें. सर्वच श्रेष्ठ कलावंत या मूल्यांचे उपासक असतात. नवकाव्याचें तें कांहीं व्यवच्छेदक लक्षण नव्हे. उलट, आजच्या बऱ्याच नवकाव्यांत सौंदर्यापेक्षां कुरूपतेवर व मांगल्यापेक्षां अमांगल्याच्या दर्शनावर अधिक भर दिलेला आढळतो. खुद्द भावे यांचें ' हळवें भिंग 'हि याला अपवाद नाहीं. बेकारांचे तांडे, हाडांचे सांपळे, रक्ताचें वंगण, अपुऱ्या दिवसांचें बालक, आळ्या, कृमि, फाटलेला भांग, सुरकुतलेला गाल, भेगाळलेले ओठ, प्रभात-कुंडींत गळून पडलेल्या कळ्या इत्यादींची रेलचेल ' हळव्या भिंगां ' त आढळते. यामुळेंच कांहीं लोक नवकाव्यावर विकृततेचा आरोप करतात.

परंतु अशा तऱ्हेनें सर्वच नवकवींवर विकृततेचा व हीनतेचा आरोप करणेंहि युक्त नाहीं. आजच्या जीवनांत भरलेल्या कुरूपतेवर व अमांगल्यावर नवकवि जो विशेष भर देतो त्याचें कारण त्याला कुरूपतेंत आनंद वाटतो हें नसून, त्याची त्याला तीव्र जाणीव झालेली असते व याविषयींची चीड, संताप व उद्वेग त्याला व्यक्त करावयाचा असतो. आजचें जीवन कटुतेनें, अ-मांगल्यानें व कुरूपतेनें बरबटलें आहे, हें सर्वच मान्य करतात; पण या कटुतेला बगल देऊन खोट्या स्वप्नवादांत रममाण होण्याची जी वृत्ति कांहीं लोकांत आढळते ती नवकवींला अमान्य असते. एवढेंच नव्हे तर, आपल्याला आलेली ही कटुतेची व विद्रूपतेची प्रतीति वाचकाच्या अंतःकरणापर्यंत भिडली पाहिजे असेंहि त्याला वाटतें. या कटुतेची, वैफल्याची, अ-मांगल्याची वाचकाला उत्कट जाणीव व्हावी व स्वप्नाळुपणांतून तो जागा व्हावा म्हणून नवकवि रूढ संकेतांना व कल्पनांना धक्के देत असतो. आणि यासाठींच बहुधा तो शब्दांची मोडतोड करणें, गद्यप्राय व ओंगळ वाटणारीं प्रतीकें वापरणें, नादमाधुर्याचा मुलाहिजा न बाळगणें व सर्वच काव्यतंत्राला ठोकरीनें उडवून लावणें इत्यादि क्रिया करीत असावा. परंतु या धक्काधक्कींत पुष्कळदां मूळ काव्यालाच गचांडी मिळते. आजच्या नवकाव्यांत आढळणाऱ्या ओबडधोबडपणाचें हेंच कारण आहे. श्री. भावे यांच्या काव्यांतहि याचा प्रत्यय कांहीं वेळां येतो.

कवितेचें लक्षण सांगतांना ज्या 'अंतःसंगीता'चा कवीनें उल्लेख केलेला आहे त्याची प्रतीति वाचकाला क्वचितच येते. ' गजाआडच्या ', ' नाहीं चालूं देणार तुमचे थेर ', ' निदान एवढं तरी कर ' या कविता गद्यप्राय तर आहेतच, पण त्यांचा आशयहि वृत्तपत्रीय वाङ्मयाहून फारसा उच्च नाहीं. प्रा. भाव्यांनीं प्रस्तावनेंत अंतःप्रेरणा, सहजप्रवृत्तीचें उदात्तीकरण इत्यादि गोष्टींचा उल्लेख केलेला असला तरी त्यांचें काव्य मुख्यतः बौद्धिक पातळीवरूनच








लिहिलेलें आढळतें. त्यामुळें त्यांतील भावनांची शुष्कता जाणवते. 'आतां कशाला ?', 'केंसामध्यें', 'मावळतीचा', 'हस्तनक्षत्रांतील रात्र' यांसारख्या कांहीं कवितांतून हळुवार भाव प्रकट झालेले आहेत, पण त्यांतील त्रुटितपणामुळें ते रसपुष्ट होत नाहींत. कांहीं ठिकाणीं आशयाचें बौद्धिक ग्रहण झाल्याबरोबर तें कवितारूपानें मांडण्याचा प्रयत्न झाल्यामुळें, त्यांतील प्रतीकांचा एकमेळ न होतां तीं इतस्ततः विस्कटल्यासारखीं वाटतात व 'अपुऱ्या दिवसांच्या बालका 'प्रमाणें अर्धोंकच्च्या स्वरूपांत तीं व्यक्त होतात.

रचनेचा हा भाग सोडून काव्याच्या आशयाकडे वळलें असतां प्रा. भावे यांचें मानवताप्रेम व त्यांचा आशावाद यांची प्रतीति वारंवार येते. नवकवींमध्यें आज मुख्यतः जीवनाचा उबग आलेले निराशावादी व भावी कालांतील उज्ज्वल भविष्यावर विश्वास असलेले आशावादी असे दोन पंथ आढळतात. श्री. भावे हे दुसऱ्या पंथांतील आहेत. संग्रहांतील पहिलीच 'तेजोवलया' व शेवटची 'काढ थोडी कळ' या दोन कविता वाचल्या तरी त्यांच्या आशावादाची प्रतीति येते. तेजोवलयानें आजच्या जीवनाचा चालविलेला हा नाश सत्त्वपरीक्षेसाठीं आहे असें ते मानतात. अणुस्फोटानें निर्माण झालेल्या राखेच्या ढिगांतुन उद्यां प्रकाशकमल उगवणार आहे असें त्यांचें मन ग्वाही देतें. मध्यरात्रीच्या अंधारांतून चंद्रकला जन्म घेत असल्याचें ते पुनः पुन्हां सांगतात. त्यांच्या कवितेंत ठिकठिकाणीं आलेलें हें प्रकाशपूजन त्यांच्या जिवंत आशावादाची साक्ष देतें. परंतु आशावादित्व व मानवताप्रेम या गोष्टी मूलतः कितीहि चांगल्या असल्या तरी त्यांचें काव्यात्मक आविष्करण करावयाला जें सामर्थ्य असावयास पाहिजे तें तेवढ्या प्रमाणांत प्रा. भावे यांच्या कवितेंत आढळत नाहीं. नवकाव्याची वाढ केवळ बौद्धिक चर्चेनें होणार नाहीं. आपल्याबरोबर वाचकांना खेंचून नेण्याचें त्याचें सामर्थ्य मुख्यतः वाढलें पाहिजे. आणि असें तें वाढलें म्हणजे त्याचें वेगळें समर्थन करीत राहण्याची तादृश आवश्यकताहि राहणार नाहीं. त्या सामर्थ्याचा अभाव हेंच आजच्या नवकाव्यांतील प्रमुख वैगुण्य आहे.

'छिन्नध्वज'

प्रा. भावे यांच्याप्रमाणें 'छिन्नध्वज 'कर्ते शरद् हेहि आशावादी व मानवतेचे उपासक आहेत. क्रांतीची ओढ त्यांच्या अंतःकरणाला अतिशय लागून राहिल्याचें दिसतें. जगांतील सर्व प्रकारच्या शोषणांचा नायनाट करून पददलितांचा उद्धार करणारी व समतेचा ध्वज उंच फडकवून विश्वशांति निर्माण करणारी क्रांति कवीला अभिप्रेत आहे. त्यासाठीं प्राणांचें मोल देण्याचीहि त्याची तयारी आहे. आजपर्यंत ज्यांनीं या क्रांतीसाठीं प्रयत्न केले, त्या सर्व वीरांना व हुतात्म्यांना कवीनें गौरविलें आहे. महाराष्ट्र व भारत यांविषयीं कवीला अभिमान आहे, पण तो संकुचित नाहीं. त्याच्यापुढें विश्वक्रांतीचें ध्येय आहे. आणि या भूमिकेवरूनच तो चीनमधील क्रांतीचें स्वागत करतो. सारांश, ज्याला आपण राष्ट्रीय, पुरोगामी, क्रांतिकारक असें म्हणतों त्या सर्वांचें अस्तित्व या संग्रहांत आढळतें. प्रेमगीतांमधून, निसर्गवर्णनांमधून वा बालक्रीडेंतूनसुद्धां हा आशय या ना त्या स्वरूपांत व्यक्त झाला आहे. 'संन्यासिनी' कवितेंतील प्रेयसी कर्तव्याखातर मरणाऱ्या आपल्या प्रियकराला स्वार्थानें मार्गें न खेचतां, कर्तव्य पार पाडण्यास उत्तेजन देते. 'निरोप' या कवितेंतील नायक प्रियेचा निरोप मागतांना म्हणतो : 'प्रेमाहुनि परि प्रिय मज हृदयीं, झिजणें, मरणें तत्त्वापायीं' 'जयंती' या दोन प्रेमी जीवांच्या कथेंतहि देशप्रेमाची पार्श्वभूमि आहेच. शरद्-ऋतूचें वर्णन करतांना कवीला युगायुगांतून चालत आलेल्या दलित भिकाऱ्याची आठवण होते. झाडावर बसलेल्या पक्ष्याला लहान मुलाशीं बोलतांना 'सतत खावें कामकऱ्यांनीं; बैसुनि खावें ऐतखाऊंनीं' असा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं कवीला स्वातंत्र्य, क्रांति, समता, दलितांची होणारी पिळवणूक यांखेरीज कांहीं दिसत नाहीं. तोच तो विषय त्याच त्या पद्धतीनें हाताळलेला असल्यामुळें काव्याला एकांगीपणा व एकसुरीपणा आलेला आहे. स्वातंत्र्य या एका विषयावरच या चिमुकल्या संग्रहांत 'स्वातंत्र्याचें मोल', 'सोन्याचा दिवस कधीं येणार ?',








'सोन्याचा दिवस', 'अंगाई गीत', 'स्वातंत्र्याचें बीज', 'स्वातंत्र्यदीपावलि', 'स्वातंत्र्याचा दीपोत्सव' इतक्या कविता लिहिलेल्या आहेत. शिवाय 'भगवा झेंडा', 'छिन्नध्वज', 'ध्येयध्वज', 'जयजय महाराष्ट्रदेशा', 'जयहिंद चिरंतन हिंद', 'जयघोष करा' इत्यादि कवितांमधूनहि हाच भाग पुन्हां प्रत्यक्षाप्रत्यक्ष आला आहेच.

या एकाच विषयावरील विविध कवितांमधून वैचित्र्य किंवा उत्कटता फारशी नाहीं. सर्वत्र कवीचा भाबडा उत्साह मात्र दिसून येतो. या प्रकारच्या उत्साहातिरेकामुळें कांहीं कवितांना हरदासी थाटाच्या प्रवचनाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. 'जगन्माता', 'अमर गांधीजी', 'एक जग', 'कला आणि जीवन' या कवितांमधून असली बोधपरता फार डोकावते. कवीला संक्षिप्त व सूचक पद्धतीनें सांगणें जमतच नाहीं. "हृदयवीणेच्या तारांच्या स्पंदनांतून उत्पन्न झालेलें शब्दसंगीत म्हणजे काव्य" या खुद्द कवीच्या व्याख्येला उतरणारें काव्य 'स्वप्नमय सागरवेला', 'हिमगीत', 'शरद्' (पृ. २८) इत्यादि कांहीं थोड्या कविता सोडल्या तर बाकीच्या ठिकाणीं आढळत नाहीं. कारवारच्या निसर्गरम्य सागरकिनाऱ्याचें वर्णन करणारी 'स्वप्नमय सागरवेला' ही कविता मात्र नितान्तरम्य आहे. पण गेल्या तीस वर्षांत लिहिलेल्या कवितांमध्यें अशा कविता अपवादात्मकच. या तीस वर्षांत कवीची बदलत चाललेली वृत्ति व आत्मनिरीक्षण यांचा मात्र वाचकाला चांगला प्रत्यय येतो. परंतु जवळ विशेष प्रकारचें रचनाकौशल्य किंवा प्रतिभासामर्थ्य नसल्यानें गेल्या तीस वर्षांतील प्रमुख राष्ट्रीय घटनांची नोंद, एवढेंच स्वरूप प्रस्तुत काव्यसंग्रहाला प्राप्त झालेलें आहे.

## 'जयजयवंती'

'छिन्नध्वजा' प्रमाणेंच 'जयजयवंती' या श्री. काटकरांच्या संग्रहांत कवीची नवी-जुनी कविता एकत्र केलेली आहे. परंतु या दोन कवींचा पिंड व प्रकृति एक नाहीं. शरद् यांच्या काव्याची बैठक एका निश्चित विचारसरणीवर व तिच्या प्रचारावर उभारलेली आहे, तर काटकरांचा पिंड केवळ कलावाद्याचा आहे. 'संपली रात्र' या कवितेंतून जरी कवीनें स्वातंत्र्याचा आनंद व्यक्त केलेला असला, या विपरीत परिस्थितीवर उपाय म्हणून रुद्राला तांडवनर्तन करण्याचें आवाहन जरी एखाद्या कवितेंतून त्यांनें केलें असलें, 'वास्तवता' सारख्या कवितेंतून मूर्तिभंजनापर्यंत जरी कवीची मजल गेलेली दिसली, तरी श्री. काटकरांच्या कवितेचा हा स्थायी भाव नव्हे. क्षणोक्षणीं चाललेल्या या आत्मवंचनेवर उपाय म्हणजे सौंदर्यपूजा, असें कवीला वाटतें. कारण 'सौंदर्यांतुनि होइल अंतीं, सत्याचा तुज साक्षात्कार' अशी त्याची श्रद्धा आहे.

आपली कविता 'कोमल तीव्र स्वरांची' आहे असें जरी कवि म्हणत असला तरी तीमध्यें तीव्रतेपेक्षां कोमलपणाचाच भाग अधिक आला आहे. शांत, सौम्य असेंच वातावरण बहुतेक कवितांमधून व्यक्त झालें आहे. धक्काधक्कीचा मामला त्याला मानवत नाहीं. झोपडींतील कंगाल दशा, राक्षसी महत्त्वाकांक्षेतून निर्माण झालेला अणुगोलक व त्याच्याकडून होणारा संहार इत्यादि गोष्टी टाळण्यासाठीं कल्पनेच्या पंखांवर बसून चंदेरी सृष्टीच्या निवान्त सांवलींत कवि जाऊं इच्छितो. आणि तेथें संगीताचे झंकार ऐकीत प्रणयकूजनांत मग्न व्हावें असें त्याला वाटतें. 'तरल कल्पनाविलासीं बेहोष' होणारा उमर खय्याम आणि 'प्रीतीच्या विमल सौंदर्यकलेचा ईश' कालिदास हे त्याचे विशेष प्रिय आहेत. कवीच्या सौंदर्यपूजेंत स्त्रीप्रेमालाच प्राधान्य मिळालेलें आहे; आपल्या रागदारीविषयीं बोलतांना 'रागिणी आळवी अनुरागाचें गीत' असें त्यांनीं पहिल्याच कवितेंत सांगून टाकलें आहे. आणि 'गायिकेविना स्फुरणार कशी रागिणी?' हा प्रश्न असल्यामुळें त्या गायिकेच्या अनुनयावरच त्यानें विशेष भर दिला आहे. प्रणयाच्या खालोखाल या संग्रहांत बालगीतांना प्राधान्य आहे. पण त्यांतहि कल्पनेची वा भावचित्रणाची विशेष चमक दिसून येत नाहीं. 'हंसरें जीवन' या कवितेवर तर यशवंतांची संपूर्ण छाप पडलेली आहे. कवीजवळ भाषासौष्ठव व रचनेची सफाई भरपूर आहे. पण आशयांत नावीन्य










नसल्यामुळें वाचकाच्या मनावर विशेष परिणाम होत नाहीं. भूपतिवैभव, गज्जल, सुनीत, द्राक्षकन्या इत्यादि रविकिरणमंडळानें लोकप्रिय केलेलीं वृत्तें, प्रणयविषयक ठराविक कल्पना व वर्णनें ठिकाठिकाणीं आढळतात. 'तुला काय सांगावयाचें आहे ?' या प्रस्तावनाकारांच्या प्रश्नाला कवीचें 'परिचित एखादी स्वरलहर वाटे देईल तुज संजीवन' हें उत्तर असावें. यांतील स्वर इतके परिचित आहेत कीं, शेवटीं ते सांकेतिक वाटतात. वाचकांना 'संजीवन' देण्याचें सामर्थ्य त्यांत नाहीं. 'ताजमहाल'सारख्या कवितांतून त्याचें थोडें फार रंजन मात्र होतें.

## 'आनंदभैरवी'

'जयजयवंती' प्रमाणेंच 'आनंदभैरवी' हें बोरकरांच्या काव्यसंग्रहाचें नांव रागदारीची आठवण करून देणारें आहे. बोरकरांची कविता म्हटली कीं, वाचकांच्या मनांत विशिष्ट अपेक्षा निर्माण होतात. कोणी त्यांच्याकडे तांब्यांचे वारसदार म्हणून पाहतो, कोणाला त्यांच्या काव्यांत प्रादेशिकता व गोव्याचीं वैशिष्ट्यें आढळतात, कोणाला त्यांच्या कवितेंतील मखमाली शृंगार आवडतो, कोणाला त्यांतील स्वरमाधुर्य वा विविध रंगीं निसर्गवर्णनें भुरळ घालतात, तर कोणाला त्यांतील आध्यात्मिक स्पर्श प्रिय वाटतो. बोरकरी कवितेचीं वैशिष्ट्यें याहि संग्रहांत आढळतात. आध्यात्मिक परिभाषा वापरण्याची व अनुप्रासयुक्त शैलीची जुनी हौस येथेंहि मधून मधून डोकावते. शृंगार व अध्यात्म यांचें मिश्रणहि 'हरिच्या स्मरभुवनीं', 'रुमडाला सुम आलें ग' यांसारख्या कवितांतून दिसतें. 'श्रावणदर्शन' सारख्या कवितेंत 'दूधसागरां'तल्याप्रमाणें चित्रमय निसर्गवर्णनहि आढळतें. 'समजावणी', 'एक सायंचित्र', 'घरणी आणि रमणी' यांसारख्या कवितांतून इंद्रियलोलुप प्रेमाचीहि अभिव्यक्ति झाली आहे. गोव्याचीं वैशिष्ट्येंहि मधूनमधून आढळतात. 'माझ्या गोव्याच्या भूमींत'या कवितेंत गोव्याचीं सर्व वैशिष्ट्यें काव्यात्मक पद्धतीनें मांडलेलीं असून त्या कवितेच्या शेवटीं कवि म्हणतो कीं,

"माझ्या गोव्याच्या भूमींत
सारा माझा जीव जडे
पुरा माझ्या कवनांचा
गंध तेथें उलगडे."

या साऱ्या वैशिष्ट्यांबरोबर तत्त्वचिंतनाची व आत्मशोधनाची पूर्वीची वृत्तीहि कायम आहे. एखादा कवि सातत्यानें बरींच वर्षें काव्य लिहीत असला कीं त्याच्या कांहीं लकबा ठरून जातात. पुष्कळदां वृत्तींनाहि एक प्रकारची घनता येत जाते व त्याचें काव्य ठराविक ठशाचें होण्याची भीति असते. कवि आत्मजागृत असल्यास व त्या दृष्टीनें जीवनाकडे पाहात राहिल्यासच हा धोका टाळणें शक्य असतें. बोरकरांच्याजवळ ही वृत्ति असावी असें वाटतें. 'जीवनसंगीता' पासून 'आनंदभैरवी' पर्यंत त्यांच्या वृत्तींत व शैलींत कांहीं एका प्रमाणांत बदल होत असल्याचें दिसतें. कांहीं जुन्या गोष्टी कायमच असल्या तरी विकासाच्या दिशेनें कवीचीं पावलें पडत असावींत असें मानण्यास 'आनंदभैरवी'त जागा आहे. उदा०—सागराचे उल्लेख त्यांच्या सर्वच संग्रहांतून आढळतात. 'दूधसागर' मध्यें सागराला जाग आल्याचाहि उल्लेख आहे. पण प्रस्तुत संग्रहांतील सागराला उद्देशून लिहिलेल्या कवितेंतील

"जळो जळो स्वास्थ्याचें कुंपण
दुबळ्या आकांक्षांचें घरकुल
तुझ्यापरी रुधिरांत उठूं दे
अखंड धडपड, अखंड तळमळ"

ही जाणीव 'आनंदभैरवी'त तीव्र झालेली दिसते. म्हणून या संग्रहांत पूर्वीच्याइतकीं निसर्गवर्णनें नाहींत, रागदारीयुक्त चाली नाहींत किंवा प्रेमाला प्राधान्य नाहीं. स्पर्शसुगंधानें धुंद झालेल्या स्वरशृंगारापेक्षां, परिस्थितीची आंच लागल्यामुळें मुखांतून निघणारे खडे तात्त्विक बोलच येथें अधिक आढळतात. आतांपर्यंत न दिसणारा उपरोधहि मधून मधून डोकावतो. आजपर्यंत बोरकरांची कविता प्रीति व भक्ति यांत रममाण झालेली होती. पण गेल्या पांच-सहा वर्षांत झालेल्या कटु घटनांमुळें कवीचीं आजपर्यंतचीं मूल्यें विचलित झालेलीं










आहेत. ज्या 'भगवती स्वतंत्रते'चें स्तोत्र कवीनें गायिलें, ज्या 'स्वातंत्र्यलक्ष्मी'च्या आगमनाप्रीत्यर्थ कवि महान् दिवाळी साजरी करूं इच्छितो तें स्वातंत्र्य आलें, पण त्याची फलश्रुति काय? स्वातंत्र्याबरोबर समृद्धि व शांतता तर आली नाहींच, पण देश दुभंग झाला, जीवनांतील कटुता वाढली व स्वातंत्र्यदात्या राष्ट्रपित्याचा वध झाला आणि 'स्वातंत्र्याची अशा दिवाळी कशी करूं साजरी?' असा शोक करण्याचा प्रसंग मात्र निर्माण झाला! स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपल्या आकांक्षांचा झालेला चुराडा, जीवनांत शिरलेली भ्रष्टता व गांधीजींचा वध इत्यादि घटनांचा विषाद व दुःख कवीनें 'स्वातंत्र्याचा दीपोत्सव', 'हांसत लावा वज्रटिळा', 'असलें हें फळ कैंवि तपाला?', 'कानफाट्याचा फटका' इत्यादि कवितांमधून प्रभावीपणें मांडलेलें आहे. त्याबरोबरच एक प्रकारच्या वैफल्यानेंहि कविमनांत प्रवेश केलेला आहे. अशा मनःस्थितींत,

"डोळे असून मी आई—कां गे अजूनि आंधळा?
ठेंचाळतों पदोपदीं—पाय असून पांगळा."

अशी त्याची अगतिक स्थिति झाली आहे. तो 'वास्तवता मज न दिसे' असा आक्रोश करीत आहे. ज्या माणुसकीची भिक्षा कवि मागतो त्या माणुसकीचा मुडदा त्याच्या डोळ्यांसमोर पडलेला दिसून येत आहे. ज्या मुखवट्यामुळें तो या जाणिवेपासून आजपर्यंत अलिप्त राहिला होता तो मुखवटा तोडून फोडून टाकण्यास तो तयार झाला आहे. या सर्व स्थितीचें चित्रण हेंच या संग्रहाचें वैशिष्ट्य आणि यामुळेंच 'जीवनसंगीत'-कर्त्याची गायकी 'आनंदभैरवी'त बदललेली दिसते. कवीनें या संग्रहाच्या प्रारंभीं हा संग्रह म्हणजे आपल्या भावसंगीताची भैरवी असल्याची शक्यता सूचित केली आहे. पण हें कवीचें वैराग्य तात्पुरतें आहे असें मानण्यास हरकत नाहीं. कारण, या संग्रहानंतरहि कवीचें भावसंगीत स्फुरत असलेलें आढळतें. शिवाय, कवीचें मन मूळचें आशावादी व 'विफलतेंत सफलता' शोधणारें असल्यामुळें हें भैरवीगीत म्हणजे सर्वच गाण्याची परिसमाप्ति न मानतां एका बैठकीचा शेवट मानणेंच इष्ट आणि आशादायकहि नाहीं का?

---

श्री. का. शि. पाटील

# गेल्या विज्ञानपरिषदेंतील कांहीं विचार

लखनौला जानेवारीच्या पहिल्या आठवड्यांत भारतीय विज्ञान-परिषदेचें ४० वें अधिवेशन भरलें होतें. पंतप्रधान नेहरूंनीं त्याचें उद्घाटन केलें. कलकत्त्याचे डॉ. देवेंद्रमोहन बोस त्याचे अध्यक्ष होते. अधिवेशनांत तेरा शाखांचे तेरा विभाग असतात आणि त्याप्रमाणें काम चालतें. शिवाय, सामान्य माणसाला विज्ञानाचा व आपल्या जीवनाचा संबंध समजून येण्यासाठीं जनसुलभ व्याख्यानें ठेवलेलीं असतात. तीं पण यंदा चांगलीं झालीं. केंब्रिज विद्यापीठाचे डॉ. टॉड, लंडनचे डॉ. स्टन्ले व्हाईट, बंगालमधील जाधवपूरचे डॉ. एस्. के. बानर्जी व खरगपूरचे डॉ. जे. सी. घोष यांचीं भाषणें खूपच चांगलीं झालीं.

या अधिवेशनाचें उद्घाटन करतांना पं. नेहरू यांनीं शास्त्रीय दृष्टिकोनावर विशेष भर दिला. त्यांच्या भाषणाचा सारांश असा: "आपलें सरकार विज्ञानाला फारच महत्त्व देतें. गेल्या पांच वर्षांत प्रयोगशाळांची सांखळी देशांत तयार झाल्यानें, विज्ञान-संशोधनाला चांगलीच गति मिळाली आहे. विज्ञानाची महती आपल्याला समजलेली असली, तरी तें विज्ञान आपण अलग ठेवूं पाहतों. आपले विचार बनवितांना आपण वैज्ञानिक पद्धतीचा उपयोग करीत नाहीं. त्यामुळें

आपलें मन विज्ञानपूर्व काळांत वावरत असतें. ज्या मनानें विज्ञान निर्माण केलें तें मन विज्ञानपूर्व युगांत रखडत आहे ! विज्ञानसंशोधनामुळें जग जवळ येत आहे, असें एकीकडे आपण म्हणतों, तर दुसरीकडे आपण इतके असहिष्णु बनलों आहोंत कीं, इतरांचें अस्तित्व आपल्याला सलतें आणि तें नष्ट करण्याला आपण प्रवृत्त होतों ! आज प्रत्येकजण सहकार्याचा उद्घोष करीत असला तरी विकार, भीति आणि अविश्वास यांच्या बाजूकडेच माणसें वाहवत जात आहेत. मानवाची या परस्परविरोधी दोन प्रवृत्तींतून सुटका झाली तरच जगाला आशा आहे. आजपर्यंत मानवाच्या भौतिक गरजा भागविण्याचें उद्दिष्ट विज्ञानानें समोर ठेवलें होतें. त्या दृष्टीनें विज्ञानानें भरीव कामगिरी केली ही गोष्ट निर्विवाद. पण विज्ञानाचा संदेश यापेक्षां भव्योदात्त आहे. मानवाच्या विचारपद्धतीला विज्ञानानें आकार दिला पाहिजे. विज्ञानानें निखळ बुद्धीची कांस धरायला माणसाला शिकविलें पाहिजे. प्राचीन काळीं आर्थिक व राजकीय सत्ता हातीं नसूनसुद्धां विद्वानांना समाजांत श्रेष्ठ मानण्यांत येत असे. पण आज राज्यकारभाऱ्यांना अवास्तव महत्त्व दिलें जात आहे. आपण प्रयत्नपूर्वक तें पूर्वीचें गौरवाचें स्थान विद्वानांना मिळवून दिलें पाहिजे. प्राचीन काळच्या मूल्यांची पुनःस्थापना करून, वैज्ञानिकांना आजच्यापेक्षां अधिक मानाचें स्थान मिळालें पाहिजे."

अधिवेशनाचे अध्यक्ष डॉ. देवेंद्रमोहन बोस यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत प्रथम इंग्रजी भाषेच्या महत्त्वाचा उल्लेख केला. ते म्हणाले, "इंग्रजी राज्यामुळें आपल्या देशांत इंग्रजी भाषेला एक खास महत्त्व आलें आहे. सुशिक्षितांच्या विचारविनिमयाचें व आंतरराष्ट्रीय स्नेहाचें तें एक साधन बनलें आहे. अशा स्थितींत घाईनें पारिभाषिक शब्द रचण्याचा कारखाना उघडून इंग्रजीच्या जागीं भारतीय भाषांची प्रस्थापना करण्याचा चाललेला उद्योग हा शास्त्रज्ञांना एक काळजीचा विषय होऊन बसला आहे. शास्त्रीय संशोधन व उच्च शिक्षण या दृष्टीनें इंग्रजी भाषेचा फार महत्त्वाचा उपयोग आहे, ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाहीं." नंतर त्यांनीं सजीव प्राणी व अजीव पदार्थ यांच्या संबंधाविषयीं आधुनिक संशोधनदृष्ट्या विचार मांडले. ते म्हणाले : "सजीव व अजीव पदार्थांचा संबंध काय आहे, हा प्रश्न बऱ्याच लोकांनीं सोडविण्याचा प्रयत्न केला. विज्ञानाची गेल्या व चालू शतकांत खूपच प्रगति झाली असून रसायनशास्त्र व पदार्थविज्ञान यांच्या प्रगतीमुळें हा प्रश्न जास्तच सोपा होत चालला आहे. आपल्या देशांत सर जगदीशचंद्र बोस यांचें संशोधन खूपच महत्त्वाचें आहे.

"सजीव व अजीव ह्यांचे संबंध स्पष्ट व्हावयाचे असतील तर त्याकरितां विश्वाच्या निर्मितीचा विचार केला पाहिजे; विश्वांत या पृथ्वीवर प्राणी कसा जन्मला आणि पहिला प्राणी निर्माण झाल्यापासून आजची झालेली प्राण्यांची उत्क्रांति कशी होत आली ह्या गोष्टी समजल्या पाहिजेत. यावर आतांपर्यंत शास्त्रज्ञांनीं खूपच प्रयोग केले आहेत.

"विश्व निर्माण होण्याविषयीं आणि त्याच्या स्वरूपाविषयीं खूपच वाद आहेत. ख्रिश्चन धर्मकल्पनेप्रमाणें किंवा टालेमीच्या मतानुसार विश्व हें मर्यादित असून त्याचें आयुष्य ठरलेलें आहे. परंतु न्यूटननें अनंत विश्वाच्या कल्पनेला जन्म दिला. अलीकडे एडिंग्टनच्या मताप्रमाणें हें विश्व सदोदित प्रसरण पावत आहे. त्याचें आयुष्य मोजतां आलें आहे. याच वादांत वाईत्झाकेर-( Weizsacker ) या जर्मन शास्त्रज्ञाचें मतहि विचारांत घेतलें पाहिजे. त्यानें गणितानें सिद्ध केलें आहे कीं, विश्व हें कांहीं वर्षांनीं थंड होणार ही कल्पना चुकीची आहे. कारण या विश्वांत नवीन शक्ति निर्माण करण्याची कुवत आहे. त्याप्रमाणें किती तरी हायड्रोजन वायु तयार होत असतो. शिवाय, प्रत्येक ग्रहाच्या अंतर्भागांत हायड्रोजनपासून हेलियम तयार होण्याची क्रिया सुरू असते. त्यांतून शक्ति बाहेर दिली जाते. सूर्याजवळ अशा प्रकारची शक्ति खूपच प्रमाणांत आहे. त्यांतील कांहीं भाग तो पृथ्वीला देत असतो. पृथ्वी कशी तयार झाली







याच्याविषयीं पण वाईत्झाकेरचें वेगळेंच मत आहे. आतांपर्यंतची कल्पना अशी कीं, तेजस्वी गोल फिरत असतांना परिभ्रमणांत त्याचे तुकडे पडले, त्यांतूनच जे ग्रह निर्माण झाले, त्यांतीलच एक पृथ्वी होय. हें मत वाईत्झाकेरला मान्य नाहीं. त्याच्या मतें पृथ्वीच्या घटनेचा व पृथ्वीवर सांपडणाऱ्या मूलतत्त्वांचा विचार करतां, ती इतर ग्रहांपासून अगदींच निराळी आहे, असें दिसून येतें. इतर ग्रहांपासून बाहेर सुटणारे पदार्थ व उल्का यांच्यापासून ही पृथ्वी बनलेली आहे. पृथ्वी निर्माण झाल्यावर सूर्याच्या प्रकाशानें वारा, पाऊस निर्माण झाले. अर्थात्, पृथ्वीची थंड होण्याची क्रियाहि त्यासाठीं उपयोगी पडली. पुढें वनस्पती निर्माण झाल्या. पाण्यांत राहणारे व आकाशांत उडणारे प्राणी निर्माण झाले. आणि उत्क्रांतीच्या मार्गांत अनेक स्थित्यंतरें होऊन आजचा मनुष्यप्राणी निर्माण झाला. अजीव पदार्थांपासूनच सजीव पदार्थ प्रथम तयार झाला ही गोष्ट सर्वजण मान्य करतात. परंतु तो कोणत्या पद्धतीनें किंवा कोणत्या काळीं झाला याविषयीं बरेच वाद आहेत. एवढें मात्र खरें कीं, अजीव पदार्थांत मिश्र अणु तयार होऊन प्रोटीन्सारखें पदार्थ तयार झाल्यावरच प्राण्याला जगण्याची शक्यता निर्माण झाली.

“ प्राणी व अजीव पदार्थ यांविषयीं गेल्या कांहीं वर्षांत खूपच विचार पुढें मांडण्यांत आले. गेल्या शतकांत यंत्रयुगाला सुरुवात झाली. त्या वेळींच प्राणी म्हणजे एक यंत्रच होय, अशी कल्पना पुढें आली. प्राणी व यंत्र या दोघांनाहि शक्तीचा पुरवठा लागतो. दोघांच्या क्रिया सारख्याच आहेत. अलीकडे पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र खूपच प्रगत झालेलीं आहेत. त्यांच्या साहाय्यानें शारीरिक क्रियांचें कार्य समजून आलें असून, अजीव व सजीव पदार्थांत या बाबतींत खूपच साम्य आढळून आलें आहे. सर जगदीश बोसांनीं ‘ विद्युत्-नेत्र ’ केला केला होता. शिवाय त्यांनीं अशीं यंत्रें केलीं आहेत कीं, त्यांतून प्राण्याची भावना, इच्छा व हेतु हीं समजून घेतां येतात. यापुढें जाऊन मनुष्यप्राण्यानें गेल्या युद्धांत खूपच नवीन यंत्रें केलीं आहेत. तीं माणसांचीं कामें करूं शकतात. बोलणें, चालणें, संदेश देणें, गणित करणें इत्यादि कामें यंत्रें करूं लागलीं आहेत. तेव्हां यंत्र व मानवी शरीर यांतील साम्य अधिकच स्पष्ट होतें.

“ परंतु शारीरिक क्रियांमध्यें जरी साम्य दिसून आलें तरी मानसिक क्रिया मानवी मेंदूच्याच विशिष्ट अशाच आहेत. उत्क्रांतीच्या काळांत जे बदल होत आले त्यांत मनाचा शिरकाव केव्हां व कोठें झाला हें सांगतां आलें नाहीं, तरी मनाचें महत्त्व घटत नाहीं असें नाहीं. मानसिक क्रियांची प्रगति पण आपणांस उत्क्रांतीच्या स्वरूपांत दिसते. इतकेंच नव्हे तर, एका प्राण्यापासून दुसरा प्राणी निर्माण होत असतांना विशिष्ट ( genes ) जीन्स हें कार्य करीत असतात. हे ‘ जीन्स ’ प्राण्याच्या जीवाणूं-( क्रोमोसोम ) मध्यें असतात. ज्याप्रमाणें जीन्सच्या स्वरूपांत व संख्येंत बदल होत जाईल त्याप्रमाणें उत्क्रांतीचें स्वरूप बनत जातें. मात्र हा जीन्समध्यें होणारा बदल हा निसर्गाच्या निवडीमुळें होतो का त्यामागें कांहीं विशिष्ट प्रेरणा आहे हें नीट सांगतां येत नाहीं. नूतन डार्विनवादा-( Neo-Darwinism ) प्रमाणें ‘ जीन्स ’मुळें आपोआप होणारे आनुवंशिक बदल किंवा घडवून आणलेले बदल अनपेक्षित, अनियंत्रित स्वरूपाचे असतात.

“ प्राणिव्यवहार हे यंत्रासारखे असून त्याला कार्बोहायड्रेटस्च्या ऑक्सिडेशननें शक्ति प्राप्त होते, त्याचप्रमाणें आवश्यक ती प्रतिक्रिया प्राणिव्यवहारांत घडवून आणतां येते या गोष्टी सध्यांच्या पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांच्या नियमाप्रमाणें स्पष्ट करून सांगतां येतात. सर जगदीशचंद्र बोस यांचा ‘ सजीव व अजीव पदार्थांमध्यें दिसून येणारी प्रतिक्रिया ही शरीरशास्त्राच्या नियमाखालीं येते ’ हा सिद्धान्त आजहि सिद्ध करतां येतो. परंतु उत्क्रांतीच्या कांहीं अवस्थेंतील प्राणिव्यवहार स्पष्ट करण्यासाठीं सजीवांची स्वयंप्रेरित जीवनपद्धति, सुप्त व जागृत मन यांसारख्या कल्पना मदतीस घ्याव्या लागतात. ”

जाधवपूरचे डॉ. एस्. के. बानर्जी यांनीं कृत्रिम पावसाविषयीं स्वत: केलेल्या कांहीं यशस्वी



अनुक्रमणिका

प्रयोगांची माहिती दिली. आज कृत्रिम पावसाची खूपच आवश्यकता आहे ही गोष्ट सांगावयास नकोच. कृत्रिम पाऊस पाडण्याची कल्पना जुनी असून त्यासाठीं बरेच प्रयत्न झाले आहेत. रशिया, अमेरिका व ऑस्ट्रेलिया या देशांत कृत्रिम पाऊस पाडल्याचें नमूद आहे. डॉ. बानर्जी यांनीं उपलब्ध असणाऱ्या शास्त्रीय माहितीच्या जोरावर स्वतःचें असें नवीन तंत्र बसविलें आहे. यासाठीं आकाशांत एक रबरी फुगा सोडतात. त्यांत हायड्रोजन वायु भरलेला असल्यामुळें त्याचें वजन खूपच कमी होतें. त्यामुळें तो एक चांगली मजबूत पेटी पण बरोबर नेऊं शकतो. त्या पेटीमध्यें घन बर्फ किंवा घन कार्बन डाय्-ऑक्साईड व सिल्व्हर आयोडाईड भरलेलें असतें. एक विशिष्ट वात तयार केलेली असते. त्यामुळें पेटीमधलीं स्फोटक द्रव्यें ढगामध्यें उडतात व त्याबरोबर सर्व पदार्थ सर्वत्र पसरतात. नैसर्गिक रीत्या पडणाऱ्या पावसामध्यें निसर्गतः थंडी मिळते व पाण्याच्या वाफेबरोबर आलेले धूलिकण व मीठ यांचा थेंब तयार होण्यासाठीं उपयोग होतो. परंतु वाफ थंड करून त्याचे पाण्याचे थेंब करण्यासाठीं मानवांना जास्त खर्चाचे पदार्थ वापरावे लागतात. एवढी गोष्ट मात्र खरी कीं, आतांपर्यंत तीन-चार वेळां यशस्वी रीत्या पाऊस पाडला गेला. आकाशांत ढग असले तरच या पद्धतीनें पाऊस पाडतां येतो. त्यासाठीं सरकारनें देशासाठीं मोठी योजना आंखावी असें डॉ. बानर्जी यांनीं सुचविलें. कृत्रिम पाऊस जर देशभर पाडतां येऊं लागला तर दुष्काळाची भीति जाईल, देशाचा एक मोठा प्रश्न सुटेल व जगालाहि लोकसंख्येचा एवढा मोठा बाऊ वाटणार नाहीं!

केंब्रिज विद्यापीठाचे डॉ. टॉड यांनीं आपल्या भाषणांत प्रांगारिक रसायनशास्त्राचें ऐतिहासिक सिंहावलोकन केलें. १८२८ मध्यें प्रथमच मानवी प्रयत्नानें निसर्गात असणारा पदार्थ प्रयोगशाळेंत करतां आला आणि तो म्हणजे 'यूरिया'. नंतर गेल्या सव्वाशें वर्षांत या शाखेची प्रचंड प्रगति झाली. निसर्गांत खूपच पदार्थ आढळून येतात. ते आपल्याला प्रयोगशाळेंत करतां यावेत ही शास्त्रज्ञांची इच्छा बळावत गेली. आणि आश्चर्य असें कीं, आज हे रासायनिक पदार्थ लाखांनीं मोजतां येतात! या पदार्थांचा खूपच उपयोग होतो. आजचे सर्व कारखाने व उद्योगधंदे यांच्यावरच विसंबून आहेत. प्लास्टिक, रबर, रंग, औषधें, कातडीं इत्यादि अनेक क्षेत्रांत या रसायनांशिवाय पान हालत नाहीं. जीवनविषयक क्रिया समजून घेण्याकडे शास्त्रज्ञ आज वळले आहेत. व्हिटॅमिन्स, प्रोटीन्स, इन्झाम्स इत्यादि जीवनावश्यक पदार्थ कसे तयार होतात आणि कोणत्या प्रकारें कार्य घडवून आणतात हें उघड करण्यासाठीं शास्त्रज्ञांची धडपड चालली आहे. थोडक्यांत म्हणजे प्रयोगशाळेंत जीव तयार झाला म्हणजे या शाखेला पूर्णता येईल!

लंडनचे डॉ. स्टॅन्ले व्हाईट यांनीं आपल्या भाषणांत वैद्यकशास्त्राचा गेल्या ५० वर्षांचा आढावा घेतला. त्यावरून वैद्यकशास्त्राची कशी प्रगति झाली हें नीट समजून येतें. पूर्वीच्या काळीं निरनिराळ्या वनस्पतींचा व निसर्गांत सांपडणाऱ्या वस्तूंचा औषधी कामासाठीं उपयोग करीत. परंतु गेल्या पन्नास वर्षांत वैद्यकशास्त्रांत माणसांनीं केलेलीं औषधें जास्त उपयुक्त ठरलीं आहेत. मानवकृत रासायनिक पदार्थ रोगनिवारणासाठीं वापरण्यांत आले आहेत. कांहीं रासायनिक पदार्थ रोगजंतूंचा संहार करतात ही गोष्ट शास्त्रज्ञांनीं ओळखली. तेव्हां अनेक रासायनिक पदार्थांवर प्रयोग सुरू झाले. जंतुनाशक क्रिया घडवून आणणारे पदार्थ शोधण्यांत आले. अशा पदार्थांचे प्रथम उंदीर, ससा, माकडें इत्यादि प्राण्यांवर प्रयोग करण्यांत आले. विशिष्ट रोगजंतू मारण्याची शक्ति ह्या औषधांत दिसून आल्यावर त्यांचे माणसांवर प्रयोग झाले. सल्फा ड्रग्ज व पेनिसिलीन यांचा इतिहास मोठा गमतीदार आहे. हे पदार्थ तयार होण्यापूर्वीं त्यांचा उपयोग एवढा मोठा होईल अशी कुणालाच कल्पना नव्हती. एका पदार्थाचा असा उपयोग दिसून आल्याबरोबर त्या प्रकारचे हजारों पदार्थ प्रयोगशाळेंत तयार होऊं लागले. सल्फा ड्रग्जमधले ८-१० पदार्थ खूपच उपयोगी ठरले. पेनिसिलीन, टेरेमायसिन,












## गेल्या विज्ञानपरिषदेंतील कांहीं विचार

आरियोमायसिन इत्यादि औषधी आज प्रत्येक डॉक्टराकडे दिसतात. आणि मानवी शरीरावर झालेले बहुतेक रोग दुरुस्त होऊं शकतात. सध्यां डॉक्टरांचें लक्ष रेडिओॲक्टिव्ह पदार्थांकडे आहे. मॅडाम क्यूरीनें रेडियमचा शोध लावला आणि त्याचा कॅन्सरसाठीं उपयोग दिसून आला. तेव्हांपासून या किरणोत्सर्गी ( Radio-active ) पदार्थांचा उपयोग औषधी कामासाठीं करण्यास सुरुवात झाली. कांहीं किरणोत्सर्गी पदार्थ रोग-जंतूंचा पाठलाग करतात आणि त्यांचा माग काढतात. थायरॉईड-ग्रंथींमध्यें झालेल्या विकारावर रेडिओॲक्टिव्ह आयोडिनचा उपयोग चांगलाच दिसून आला आहे. मेंदूच्या विकारावर पण हे रेडियो अक्टिव्ह आयसोटोप्स उपयोगी ठरले आहेत. कांहीं दिवसांनीं हे मानवकृत अणू व परमाणू यांच्यापासून अशीं औषधें तयार होतील कीं, तीं कोणत्याहि रोगजंतूंचा फडशा पाडतील.

बरेच महाराष्ट्रीय शास्त्रज्ञ तेथें आलेले दिसले

परंतु प्रत्यक्ष कामकाजांत चमकणारे फारच थोडे. डॉ. गोडबोले ( राजपुताना ) यांनीं आपलीं प्रश्नोत्तरें चांगलींच गाजविलीं. वनस्पतीच्या तुपाविषयीं त्यांनीं संशोधन केलें आहे. तें तूप वापरण्यास कोणतीच हरकत नाहीं असें ते सांगतात. त्याला रंग देण्याची पण आवश्यकता नाहीं. त्यांत सीसम तेल मिसळलें म्हणजे पुरें. ह्या तुपांत मिश्रण आहे अशी शंका आली तर सीसम तेलाची परीक्षा करावी आणि रंग द्यावयाचा असलाच तर कॅरोटिनचा द्यावा. ही त्यांनीं दिलेली माहिती व त्यांचीं जोरदार उत्तरें त्यांच्या अनुभवाची व सखोल ज्ञानाची साक्ष देत होतीं.

---

प त्र व्य व हा र

## तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाची दुहेरी पद्धति

प्रा. माहुलकर यांनीं आपल्या पत्रांत ( 'नवभारत' फेब्रुवारी १९५३ च्या अंकांत ) उल्लेखिलेले मुद्दे विचारार्ह असून त्यांचा पद्धतशीर विचार एखाद्या सविस्तर लेखांतच करतां येईल. संक्षेपानें त्यांस उत्तर द्यावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, तत्त्वज्ञानाच्या अध्ययनाची प्रवचनपद्धति व इतिहासपद्धति अशी त्यांनीं केलेली वर्गवारी व विभागणी शास्त्रशुद्ध नाहीं. तत्त्वज्ञानशास्त्राची व म्हणून त्याच्या अध्ययनाची पद्धति Analytic-Synthetic, Inductive-Deductive, Historical-Interpretative, Psychological-Logical अशी दुहेरी आहे. सद्वस्तूच्या अनुभवाचें योग्य ज्ञान होण्याकरितां त्या अनुभवाचें कोंदण असलेल्या इतर ( समकालीन व गत ) अनुभवांचा परिचय करून घेणें इष्ट असतें. ही झाली प्रा. माहुलकरांची इतिहासपद्धति. परंतु त्याबरोबरच त्या वस्तूच्या विचारशील चिंतनानें तिचा स्वभाव ओळखण्याचा प्रयत्न करणेंहि अवश्य असतें. याला प्रा. माहुलकर प्रवचनपद्धति म्हणतात.

रसेलचें विधान माझ्याहि पाहाण्यांत आलें होतें व तें विधानच तर्काशीं व अनुभवाशीं विसंगत आहे असें तत्त्वज्ञानाच्या अनेक अभ्यासकांप्रमाणें मला वाटत आलें आहे. त्यांतील मुख्य दोष असा कीं, सामान्यतः तत्त्वज्ञानेतिहास-ग्रंथांतून तत्त्वज्ञानाचें चित्रण जणूं पोकळींतून केलेलें असतें ही समजूत ग्राह्य नाहीं. सामाजिक, आर्थिक व इतर व्यावहारिक परिस्थितीचा बौद्धिक जीवनावर परिणाम होत असतो व जीवनाचा समन्वय तत्त्वज्ञान करीत असतें. म्हणून तत्त्वज्ञान कधींच पोकळींत वावरत नसतें. उलट, प्रत्येक तत्त्वज्ञ त्याच्या परिस्थितीचा परिणाम आहे हें विधान एकांगी आहे. परिस्थिति व व्यक्तितत्त्व यांच्या परस्परसंघट्टनानें व्यावहारिक घटना

होत असतात. प्लेटो, ॲरिस्टॉटल यांच्या वेळच्या सामाजिक परिस्थितीमुळें व त्या वेळीं विज्ञानाची प्रगति झालेली नसल्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानांत उणीवा आहेत व त्या सुधारतां येणें शक्य व अवश्य आहे, याबद्दल दुमत नाहीं. परंतु त्यांचें तत्त्वज्ञान हें त्यांनीं आपल्या प्रतिभेच्या सामर्थ्यानें परिस्थितीवर केलेली मात होय; तें नुसता तिचा परिणाम नाहीं हें विचारांतीं पटण्यासारखें आहे.

'ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्रास विज्ञानानें हरताळ फांसला' असा इतिहास नाहीं. तें कांहीं उत्साही लोकांनीं केलेलें विधान आहे. ॲरिस्टॉटलचें तर्कशास्त्र शब्दांवर अधिष्ठित आहे, या समजुतींतहि तथ्य नाहीं. विचार प्रगट करण्याचें फार महत्त्वाचें साधन म्हणून भाषेचें महत्त्व कोणी नाकारूं शकत नाहीं व ॲरिस्टॉटलनें यापेक्षां अधिक महत्त्व शब्दांस दिलें नाहीं. मूर्तिपूजेचे टीकाकार अनेक वेळां जुन्या मूर्तींऐवजीं नव्या मूर्ती स्थापीत असतात तसा हा प्रकार दिसतो. मूर्तिपूजाच करायची तर ॲरिस्टॉटल रसेलच्या तुलनेनें कमी ठरणार नाहीं हें खास !

—प्र. रा. दामले, पुणें.

---

# सार संकलन

## महाराष्ट्रांतील विधायक कार्यकर्त्यांचें संमेलन

नुकतेंच (ता. ८–९ फेब्रुवारी १९५३) महाराष्ट्रांतील विधायक कार्यकर्त्यांचें संमेलन जामनेर (पूर्व खानदेश) येथें भरलें होतें. हें संमेलन म. प्र. कॉं. कमिटीचे अध्यक्ष श्री. देवकीनंदन यांनीं बोलाविलें होतें. श्री. शंकरराव देव या संमेलनाचे अध्यक्ष होते. श्री. शंकरराव देव हे आपली खानदेशची भूदान-यात्रा संपवून नुकतेच परत आले होते. सुमारें १३५ कार्यकर्ते या संमेलनास उपस्थित होते. त्यांत श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, श्री. काकासाहेब बर्वे व मुंबई सरकारचे तीन मंत्री उपस्थित होते. या संमेलनांत (१) दुष्काळाच्या क्षेत्रांत कार्यकर्त्यांनीं प्रत्यक्ष राहून तेथें अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्या मार्गदर्शनानुसार काम करावें, (२) महाराष्ट्रांतील विधायक कार्यांचें एकसूत्रीकरण, मार्गदर्शन व संचालन करणें आणि विधायक कार्यकर्त्यांत एकवाक्यता व बंधुभाव निर्माण करणें हें काम महाराष्ट्र-सेवा-संघानें हातीं घ्यावें. (याकरितां एक सहा जणांची उपसमिति नेमण्यांत आली), (३) भूदान-यज्ञाचा १ लाखाचा संकल्प १९५४ च्या एप्रिलपर्यंत पुरा करण्यांत यावा, (४) दारूबंदीच्या धोरणास संपूर्ण पाठिंबा देण्यांत यावा—अशा आशयाचे ठराव मंजूर झाले. याविषयीं व एकंदर संमेलनांतील कार्यक्रमाविषयीं सविस्तर वृत्तान्त 'भूदान-यज्ञ'-(१९।२।५३) मध्यें आला आहे. या संमेलनांत श्री. **अण्णासाहेब सहस्रबुद्धे** यांनीं विधायक कार्याविषयीं व दुष्काळी परिस्थितीला तोंड देण्याविषयीं आवाहन करणारें एक भाषण केलें. त्या भाषणांतील कांहीं भाग पुढें दिला आहे :

"जे लोक विधायक कामें करतात ते त्या त्या ठिकाणच्या जीवनाशीं तद्रूप होत नाहींत. ज्या लोकांची सेवा आम्ही करतों त्यांच्या अंतःकरणाच्या संवेदना आम्हांला कळत नाहींत, आमच्या त्यांना कळत नाहींत. मग आमच्या कामाचा त्यांच्यावर परिणाम काय होणार? त्यामुळें पुष्कळ काळ काम करूनहि यश मिळत नाहीं आणि संघटनाहि होत नाहीं. माझ्या मनांत पुष्कळ वेळां असें येतें कीं, आज हातांत असलेलीं सर्व कामें टाकून ज्यांत लोकांच्या मनःसंवेदनांशीं आपण एकरूप होऊं असें काम घ्यावें. तें मी शोधीत आहे. मला दोषहि दिला जातो कीं, मी रोज नव्यांत रमतों. पण त्याचा अर्थ एवढाच कीं, मी शोधीत आहे. स्वराज्य मिळवावयाचें होतें त्या वेळीं आम्ही कांहींसे एकदिल झालों होतों, असें म्हणतां येईल. आज महाराष्ट्राच्या दोन कोटी लोकांचें जीवनसाफल्य

कशांत आहे हें ओळखतां आलें आणि त्यांना तें पटेल असें मला सांगतां आलें तर त्यांच्या संवेदना आणि माझ्या संवेदना एक होतील. भूदान-यज्ञांत मला असा थोडासा अनुभव आला आणि म्हणून या पदयात्रेंत एकर किती मिळाले हें मी महत्त्वाचें मानीत नाहीं. त्यांच्यांत बसून त्यांच्या अंतःकरणाचे बोल मी बोलतों याचें मला समाधान वाटतें. इतर वेळीं या संवेदना न सांपडल्यामुळें विधायक कार्य सर्कशींतल्या उड्याच ठरतात कीं काय असें वाटतें. गेल्या तीन-चार महिन्यांत मला महाराष्ट्रांत पसरलेल्या दुष्काळाची तीव्रता जाणवूं लागली. चाळीस लाख लोक दुष्काळांत सांपडलेले आहेत. सरकारतर्फे शक्य ते प्रयत्न चालू आहेत. पण मला भीति वाटते कीं, पुढचीं पांच-पन्नास वर्षें महाराष्ट्राच्या नशिबीं दुष्काळच राहणार आहे. सह्याद्रीवर पडणाऱ्या विपुल पावसानें जमिनीची सर्व माती धुपून जाऊन डोंगर उघडे पडले आहेत. झाडी नाहींशी होत चालली आहे. महाराष्ट्रांतील २ कोटी एकर जमिनीपैकीं सव्वा कोटी एकर जमीन दर चार वर्षांनीं दुष्काळांत सांपडत आहे. चालू दुष्काळामुळें ४०-५० लाख लोक घरादारांना मुकले आहेत. ३० टक्के जनावरें गेलीं आहेत. आणखीं १०।१५ वर्षें तरी त्या लोकांना पूर्वीची स्थिति येण्याची शक्यता नाहीं. दुष्काळ ही तात्कालिक आपत्ति नाहीं. ती आमच्या हलगर्जीपणामुळें दर तीन वर्षांनीं घडणारी गोष्ट आहे असें समजा. म्हणून सरकारला पटवून देऊन यावर कायमची उपाययोजना करण्याची व्यवस्था निकडीनें झाली पाहिजे. रोग कायमचा हटावयाचा असेल तर सह्याद्रीवरून दरसाल वाहत जाणारें पाणी अडविण्याच्या योजना अंमलांत आणण्याचा आराखडा सरकारनें केला पाहिजे, तरच दुष्काळ वारंवार पडण्याची भीति जाईल. सरकार सध्यां शक्य तें करीत आहे; पण जेथें जेथें वस्त्या उघडल्या असतील तेथें तेथें कार्यकर्त्यांनीं जाऊन राहिलें पाहिजे आणि मध्यस्थाची भूमिका घेऊन सरकारची आणि लोकांची मदत जनतेपर्यंत नेऊन पोंचविली पाहिजे. दोन दोन हजारांची जेथें वस्ती पडली असेल तेथें भंगीकाम करणें, लोकांना औषधोपचार बरोबर होईल असें करणें, त्यांना रेशन मिळवून देणें, त्यांच्या मुलांना संभाळणें आणि शिक्षण देणें आणि ज्या दुःखांत आज ते भाजले जात आहेत तें दुःख, थोडें का होईना, कमी करण्यासाठीं जें करतां येईल तें करणें अवश्य आहे. माझ्यासारखा तेथें गेला तर सरकारलाहि ही ब्याद कशाला आली असें वाटतां कामा नये. या वेळीं सर्वोदय-योजनेंत काम करणाऱ्यांना आणि युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांना विनंति करून विद्यार्थी-विद्यार्थिनी आणि प्रोफेसर यांनाहि या कामीं लावणें शक्य आहे. युद्धपरिस्थितीप्रमाणें आपण या आपत्तीकडे पाहिलें पाहिजे. येत्या ऑक्टोबरपर्यंत हा कार्यक्रम आपल्याला करावा लागेल. खरीपाचीं पिकें शेतकऱ्यांच्या पदरांत पडेपर्यंत हीं दुष्काळीं कामें चालविलीं पाहिजेत असें माझें मत आहे.''

## आचार्य दादा धर्माधिकारी : व्यक्ति व विचार

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध गांधीवादी विचारवंत आणि कार्यकर्ते **आचार्य दादा धर्माधिकारी** यांनीं **कु. विमला ठकार** या आपल्या धर्मकन्येला लिहिलेल्या पत्रांचा संग्रह **'अंतरींचे उमाळे'** या नांवानें लवकरच प्रसिद्ध होणार आहे. या पुस्तकाला **आचार्य स. ज. भागवत** यांची प्रस्तावना असून त्या प्रस्तावनेंत त्यांनीं **आचार्य दादा धर्माधिकारी** यांचें व्यक्तित्व व जीवनदर्शन यांसंबंधीं आपले विचार प्रकट केले आहेत. त्यांतील कांहीं भाग 'साधनें'-(१४।२५३) तून उद्धृत करून पुढें दिला आहे :

'' गांधींच्या जीवनदृष्टीचा दादांच्या जीवनावर विशेष परिणाम झालेला आहे; तथापि, त्यांच्या जीवनांत वा विचारांत सांप्रदायिकता निर्माण झालेली नाहीं. आपलें स्वतःचें व्यक्तिमत्त्व निश्चितपणें ओळखून त्याचा अखंड विकास करण्याच्या साधनेंत ते सदैव रममाण झालेले असतात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें स्वरूप समजून घेण्यासारखें आहे. 'मी सर्वसामान्य कुटुंबवत्सल, लेकुरवाळा, संसारकरू माणूस. कुटुंबांत स्नेहामुळेंच गोडवा व समाधान नांदतें. या अनुभवामुळें मीं स्नेह जोडण्याच्या व राखण्याच्या व्रीदाचाच अंगीकार केला.' दादांच्या या उद्गारांत








त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें एक तत्त्व व्यक्त झालें आहे. 'स्नेहाचे झरे' यांतील एका पत्रांत ते लिहितात : 'मी फक्त विचार करूं शकतों व विचारप्रदान करूं शकतों. नेतृत्व माझ्या ठिकाणीं नाहीं.'' माझ्या दृष्टीनें दादांच्या व्यक्तिमत्त्वाचें हें दुसरें घटकतत्त्व मानतां येईल. निरपेक्ष स्नेह आणि जीवनविषयक सर्वांगीण विचार या दोन घटकांनीं दादांचें व्यक्तिमत्त्व घडविलें आहे. त्यांचें स्वतःचें जीवनतत्त्वज्ञानहि अशाच प्रकारचें बनलेलें आहे.

"दादांनीं आपलें एक स्वतंत्र अध्यात्मदर्शनच बनविलें आहे. 'ज्या आनंदांत निरपेक्ष स्नेहा-खेरीज दुसरा कांहींहि प्रेरक हेतु नाहीं तो आनंद जीवनाचें अंतिम मूल्य आहे' असें ते मानतात. लौकिक अर्थाचें नेतृत्व दादांमध्यें नाहीं. एका अर्थानें ही फार चांगली गोष्ट आहे असें मी म्हणेन. कारण नेतृत्व म्हणजे एक प्रकारचा अहंकाराचा विलास. त्यांत इतरांना—व्यक्तींना आणि संस्थांनाहि—केवळ साधन म्हणून वापरण्याची प्रवृत्ति प्रमुख असते. असलें नेतृत्व भौतिक दृष्ट्या नवीं मूल्यें निर्माण करण्याच्या बाबतींत यशस्वी होऊं शकत नाहीं. विज्ञानाचें सामर्थ्य विषाळलें असल्यामुळें आजच्या जगांत नेतृत्व ही एक मोठी भयकारक शक्ति बनली आहे. भौतिक वस्तूं-प्रमाणेंच मानवी व्यक्ती देखील वापरल्या जाण्याच्या शक्ती व संघटना वाढत आहेत. यांतून मानवाचे आर्थिक प्रश्न कदाचित् सोडवितां येतील; परंतु त्यानें मानवतेचें मूल्य संपूर्णपणें नष्ट झाल्याखेरीज राहणार नाहीं. आर्थिक विपत्तींतून बाहेर पडण्या-साठीं एवढी किंमत मानवाला द्यावी लागणार असेल तर ती एक भीषण नियति समजावी लागेल. मानवाच्या नैतिक मोठेपणावर श्रद्धा असलेल्या कोणाहि माणसाला ही नियति अपरि-हार्य वाटणें शक्य नाहीं. दादांनाहि ती तशी वाटत नाहीं. 'ईश्वर ही आजच्या जगाची राजकीय आवश्यकता आहे' या विरोधाभासात्मक वचनांत दादांनीं आपली श्रद्धा व्यक्त केली आहे. ...दादांचा ईश्वर म्हणजे मानवाच्या हृदयांत सदैव स्फुरणारें मांगल्य.

"अहंकारी नेतृत्व सामाजिक जीवनाचा अंतीं विनाश करणारें असलें तरी सामाजिक समस्या सोडविण्याचें चिंतन करणाऱ्या प्रतिभाशाली विचारकांची समाजाला नेहमींच गरज असते. त्यासाठीं निरपेक्ष प्रेम एवढी एकच गोष्ट सत्यशोधनाला पुरी पडत नाहीं. सामाजिक जीवनाशीं उत्कटतेनें समरस होण्याची आणखी एक शक्ति आवश्यक असते. निरपेक्ष मानवप्रेम आणि अखिल मानवजीवनाशीं प्रत्यक्ष समरस बनण्याची पात्रता या दोन्ही शक्तींनीं सुसज्ज असलेला पुरुषच जीवनांत नवीन नवीन सत्यांचा साक्षात्कार घेऊं शकतो. अशा पुरुषाच्या साक्षात्कारांतून जीवनाला अभिनव विचार प्राप्त होतात. महात्मा गांधी हे या कोटींतील पुरुष होते. आजच्या समाजांत विनोबाजींनीं कांहीं अंशीं असें कार्य चालविलें आहे. दादा या कोटींतील पुरुष नव्हेत; आणि दादांना त्याची चांगली जाणीवहि आहे.

"गांधीजींच्या द्वारा मिळालेली जीवनदृष्टि आपल्या मर्यादा सांभाळून त्यांनीं आपल्या वैशिष्ट्यानें पचविली आहे. ते स्वतःला नव-विचारनिर्माते मानीत नाहींत, पण नवविचाराचे ते स्वतः वाहक बनूं इच्छितात. त्यासाठीं त्यांनीं आपली भरपूर तयारी केलेली आहे आणि त्या बाबतींत त्यांना पुष्कळशी सिद्धीहि लाभलेली आहे. सध्यां तरी कित्येक वर्षें दादांचें जीवनकार्य म्हणजे लेखन आणि भाषण हेंच झालें आहे.... दादा आपल्या अनेक व्याख्यानांना 'रटाळ' ही पदवी देऊं शकतात. आणि आपल्या कित्येक व्याख्यानां-वर ते स्वतःच बेहद्द खूष झाल्याचेंहि सांगूं शकतात. कठोर बुद्धिवादानें आपलें जीवन तपासून पाहातां येणें ही एक मोठी शक्ति आहे. ती शक्ति ज्याला निर्भयपणें चालवितां येईल त्याला आत्मवंचनेचें भय उरत नाहीं. दादांजवळ ही शक्ति फार मोठ्या प्रमाणांत आढळून येते. जीवनविषयक विचार समाजाला अतिशय परिणाम-कारक रीतीनें समजावून द्यावे, एवढीच त्यांची जीवनांतील आकांक्षा आहे. ती जेव्हां जेव्हां सफल झाल्याचा त्यांना अनुभव येतो त्या त्या वेळीं

साहजिकच त्यांचे समाधानाचे उद्‌गार निघतात. त्यांत आत्मस्तुति नसते.''

'संतांचे आंसू'

'अखंड आनन्द' या प्रसिद्ध गुजराती मासिकाच्या जानेवारी १९५३ च्या अंकांत 'संतना आंसु' या शीर्षकाखालीं श्री. अंबेलाल गो. देसाई, एम्. ए., बी. टी. (बलसार) यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखांत गांधीजींच्या जीवनांतील प्रसंगांच्या विविध आठवणी दिल्या आहेत. त्यांतील कांहीं निवडक आठवणींचा मराठी अनुवाद श्री. विश्वास चौगुले (कैवल्य धाम, राजकोट) यांनीं करून पाठविला आहे तो पुढें दिला आहे :

'' मुंबईत एकदां कॉंग्रेस भरली होती. गांधीजी तीस उपस्थित राहिले नव्हते. अहमदाबादचे अंबालाल साराभाई यांच्या बंगल्यावर ते थोडे दिवस तापानें पडून होते. ताप थोडा ओसरल्यानंतर गांधीजी विचार करूं लागले कीं, 'माझ्यासारख्या दरिद्र नारायणाला या सुशोभित महालांत राहणें शोभत नाहीं.' अंगांत असलेल्या अर्धवट तापांतून उठून चालत चालत महात्माजी साबरमती आश्रमाला गेले. तेथें ते एका बाजेवर पडलेले (अर्धवट झोपलेले) असतांना डॉ. राजेंद्रप्रसाद येऊन हजर झाले. राजेंद्रबाबूंनीं त्यांच्याकडे पाहिलें तों गांधीजी एखाद्या मुलाप्रमाणें मुळूमुळू रडत असल्याचें दृश्य त्यांना दिसलें. जवळपास बसलेले सर्व लोक बापूंना धीर देत होते. परंतु बापू शांत होत नव्हते. ते बोलले, 'मी एक काम हातीं घेतों. तें अर्धें राहून जातें आणि दुसऱ्या कामाला सुरुवात होते. हे प्रभो! माझें आयुष्य असेंच जाणार काय? सबंध रात्रभर विचार करतों कीं, आतां काय होणार? परंतु कांहीं उमज पडत नाहीं.' एवढें सांगून झाल्यानंतर त्यांच्या कंठांतून शब्द बाहेर पडेनासे झाले. हो नाहीं करतां ते शांत झाले आणि म्हणाले, 'प्रभूची इच्छा असेल तसें होईल.'...

'' बेळगांवला वार्षिक अधिवेशन भरलें होतें. महात्माजी अधिवेशनाचे अध्यक्ष होते. अधिवेशनांत स्व. देशबंधू व स्व. मोतीलालजी हजर होते. परंतु ते (दोघे) स्वराज्य पक्षाचे अधिकारी या नात्यानें आले होते. मंत्रिमंडळांत शिरकाव करून घेण्याकडे दोघांचा कल होता. मंत्रिमंडळामध्यें भाग घ्यावयाचा किंवा नाहीं याचा निर्णय घेण्यासाठींच बेळगांवचें अधिवेशन भरलें होतें. गांधीजी भाषणास उभे राहिले. तें भाषण करीत असतांनाच त्यांच्या पक्षाचे लोकहि भाषण करण्यासाठीं खटपट करूं लागले. अशा प्रकारें स्वतःचींच माणसें शिस्तभंग करीत असल्याचें पाहून गांधीजींना दुःख झालें. बोलत असतां असतां गांधीजी थांबले. त्यांचा चेहरा खिन्न झाला व डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. सर्वांचें बोलूं पाहणारा माणूस दिङ्मूढ झाला. सभेंतील कित्येक लोक महात्माजींचें दुःख सहन करूं शकत नव्हते. त्यांच्याहि डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले....

'' हिंदु-मुस्लिम ऐक्याखातर मुसलमानांची एक सभा भरली होती. त्या सभेचें गांधीजींना निमंत्रण होतें. तेथें सर्व मुसलमान त्यांची खुशामत करूं लागले. आगाखान वगैरे म्हणाले : '' आपण तर मोठे महात्मा आहांत. बॅरिस्टर जिनांच्या फक्त १४ मागण्या कबूल करा ना! तुमच्यासारख्यांना ही कठीण गोष्ट नाहीं. आपणासारख्यांना ही तर एक क्षुल्लक बाब आहे.'

'' बापू म्हणाले, 'तुम्ही सर्व एकत्र जमून माझी थट्टामस्करी करीत आहांत हें योग्य नव्हे.'

'' शौकतअल्ली म्हणाले, 'हे माझ्या मायबापा! ('अरे मारा सरकार') तुम्ही एवढी मागणी मान्य करा. तुमच्यासारख्यांना ही कांहीं मोठी गोष्ट नाहीं.'

'' बापू म्हणाले, 'शौकतअल्ली! तुम्हांला असें म्हणणें शोभत नाहीं. 'मायबाप' म्हणून माझी निष्कारण संभावना कां करतां?'

'' बॅ. जिना तर एक वेळ बापूंच्याजवळ जमिनीवर बसले आणि म्हणाले, 'अहो महात्मा, आमचें एवढें म्हणणें मान्य करा ना.'

'' बेगम शहानवाझ पण जिनांच्या बरोबर होत्या. त्यांनीं पण वरीलप्रमाणेंच गांधीजींना विनंति केली. त्या वेळीं गांधीजींच्या डोळ्यांत अश्रू आले. ते बेगम शहानवाझना म्हणाले, 'बाकी सर्व या

थट्टामस्करींत पूर्णपणें सामील झालें आहेत; परंतु स्त्री असून तुम्ही पण या गोष्टींत भाग घेत आहांत हें माझ्यानें सहन होत नाहीं ! '

" या सभेनें हिंदु-मुस्लिम ऐक्य अधिकच निखळलें. सर्व मुसलमान एकत्र येऊन आपली फजिती करूं लागले, हें गांधीजींना आवडलें नाहीं. त्यांतहि बेगम शहानवाझ यांच्या शब्दांनीं गांधीजींना अधिकच दुःख झालें. कारण गांधीजी स्वतः समजत होते कीं, स्त्री ही पुष्कळ दयाळु असते आणि ती कोणाचें दुःख सहन करूं शकत नाहीं. "

### श्री. धुमकेतु यांची षष्ट्यब्दपूर्ति

गुजरातचे श्रेष्ठ लघुकथाकार श्री. धूमकेतु ऊर्फ गौरीशंकर गोवर्धनराम जोशी यांचा षष्ट्यब्दपूर्ति-समारंभ अहमदाबादला नुकताच साजरा झाला. श्री. धूमकेतूंची लघुकथालेखक म्हणून महाराष्ट्राला थोडीफार ओळख आहे. श्री. जांभेकरांच्या ' **लोकशिक्षण** ' मासिकांत त्यांच्या कांहीं गोष्टींचे अनुवाद आलेले होते. त्यांची इंग्रजींत अनुवादिलेली Post Office नांवाची कथा बहुतेकांनीं वाचली असेल. त्यांचे गुजराती कथासंग्रह ' तणखा ' ( ठिणग्या ) नांवानें प्रसिद्ध झालेले आहेत. ' तणखा-मंडळ १ ' हा संग्रह सर्वांत अधिक आकर्षक ठरलेला आहे. त्यांनीं नंतर अनेक ऐतिहासिक कादंबऱ्याहि लिहिल्या. त्यांत ' चौलादेवी ' नांवाची सोमनाथाच्या पार्श्वभूमीवरील ' नवलकथा ' प्रभावी उतरली आहे. त्यांच्या षष्टिपूर्तीनिमित्तानें श्री. रामप्रसाद शुक्ल यांचा एक लेख गुजराती ' संदेश ' दैनिकामध्यें ( ११-२-५२ ) आला आहे. त्यांतून पुढील भाग संकलित केला आहे.

" श्री. धूमकेतूंचा जन्म सौराष्ट्रांतील वीरपुर गांवीं १८९२ सालीं २८ डिसेंबर रोजीं झाला. स्वावलंबी जीवन कंठून ते मॅट्रिक झाले व पुढें जुनागढच्या बहाउद्दीन कॉलेजांतून त्यांनीं बी. ए. पदवी घेतली. गोंडळच्या हायस्कूलांत प्रथम शिक्षक म्हणून काम केल्यावर रेल्वे ऑडिट ऑफिसांतहि त्यांनीं नोकरी केली. अखेरीस ते अहमदाबादेस आले. तेथें ते श्रीमंत कुटुंबांतून खासगी शिक्षक म्हणून काम करीत. गेलीं २५ वर्षें ते अहमदाबादेस आहेत. तेथूनच त्यांचें साहित्यसृजन झालें. 'तणखा'-('ठिणग्यां')चीं चार मनोहर ' मंडळें ', चालुक्यांच्या काळांतील गुजरातचा संस्कारसौरभ पसरविणाऱ्या बारा कादंबऱ्या, ' पगदंडी ' ( पायवाटा ) हा प्रवासग्रंथ, विनोदमिश्र ' पानगोष्ठी ' आणि आत्मकथात्मक ' जीवनपंथ ' वगैरे साहित्य त्यांत मुख्य आहे... कथाकार व विचारवंत म्हणून त्यांचें स्थान पुष्कळच मोठें आहे. क्वचित् निसर्गचित्रणांत कवित्वाची झांक दाखविणारें, तर क्वचित् तत्त्वज्ञान्याच्या व्यंजनागर्भ प्रौढतेनें युक्त असें त्यांचें गद्य ओजस्वी शब्दशैलीमुळें आस्वाद्य व हृदयंगम बनलें आहे. त्यांच्या लेखनांतील रंगदर्शी रमणीय छटा व कल्पनापूर्ण विभावना यांमुळें त्यांची लेखणी वाचकांच्या हृदयाला रसोद्रेकानें न्हाऊन टाकते, समाजजीवनांतील सर्वांत खालच्या थरांतहि आढळणाऱ्या अप्रकट सुवर्णसमृद्धीचें प्रगटीकरण करणाऱ्या समभावामुळें त्यांना जनहृदयाचे अग्रगण्य आलेखक म्हणून उच्च स्थान प्राप्त झालें आहे.

" त्यांचें साहित्य वाचीत असतां आपण प्राचीन किंवा मध्ययुगीन भावनासंपत्तीच्या क्षेत्रांत स्वैरविहार करीत असल्याचा आभास होतो. त्यांच्या निसर्गचित्रणांत वास्तवता, वेधकता आणि धरित्रीचा आत्मा यांची पकड आहे. परंतु या सर्वांतहि शिरोभागीं त्यांची सात्त्विकता शोभत आहे... "

### भारतीय 'राष्ट्रीय ग्रंथालया'ची सुवर्ण-जयन्ती

गेल्या जानेवारीच्या २९ तारखेला हिंदुस्थानच्या ' नॅशनल लायब्ररी ' ची सुरुवात झाल्याला ५० वर्षें झालीं. मुळांत हिचें नांव ' इम्पीरिअल लायब्ररी ' असें होतें. लॉर्ड कर्झननें १८९१ सालीं ही लायब्ररी अस्तित्वांत आणली; परंतु जाहीर जनतेला ती १८९३ मध्यें मोकळी करण्यांत आली. या ग्रंथालयाच्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्तानें ' टाइम्स ऑफ इन्डिया ' मधील ( १ फेब्रु. ) श्री. कृष्ण धार यांच्या लेखांतून पुढील भाग संकलित केला आहे.

" लॉर्ड कर्झन यानें सरकारी सेक्रेटारिएट-मधील ग्रंथसंग्रह या इम्पीरिअल लायब्ररींत








जोडले आणि शेवटीं कलकत्ता सार्वजनिक ग्रंथालयहि यालाच जोडलें. प्रथम ही मध्यवर्ती लायब्ररी मेटकॉफ हॉलमध्यें होती. नंतर १९०२ मध्यें ती कलकत्याच्या मिलिटरी सेक्रेटारिअट इमारतींत नेण्यांत आली. जपानी हल्ल्याची भीति वाटल्यामुळें तीं तेथून तात्पुरती चित्तरंजन ॲव्हेन्यूमधील जबाकुसुम हौसमध्यें हलविली. पण ती भीति सरतांच ती पूर्वीच्या स्थानीं परत आणण्यांत आली. हिंदुस्थान स्वतंत्र होतांच या इम्पीरिअल लायब्ररीचें रूपांतर ' नॅशनल लायब्ररी 'त झालें. पूर्वी व्हाइसरॉयांचा मुक्काम ज्या राजवाड्यांत असे त्या मोंगलांच्या वेळच्या जुन्या बेल्वेडरनामक राजवाड्यांत तिची स्थापना करण्यांत आली. या अत्यंत भव्य इमारतींतील पूर्वीच्या व्हाइसरॉयांचा नृत्याचा दिवाणखाना असलेल्या प्रशस्त दालनांत आज वाचनमंदिर आहे. येथील अभ्यासशाखा सबंध वर्षभर सणावारींहि अभ्यासकांना उघडी असते. या सोयीचा फायदा सबंध हिंदुस्थानांतले अभ्यासू वाढत्या संख्येनें घेत आहेत.

" गेल्या ५० वर्षांत या ग्रंथालयांत अनेकविध पुस्तकांचा आणि दुर्मिळ हस्तलिखितांचा संग्रह तयार झाला आहे. बुहारच्या जमीनदारसाहेबांनीं दुर्मिळ फारसी, अरबी व उर्दू ग्रंथांचा संग्रह मोठ्या उदारपणें या ग्रंथालयाला देणगीदाखल दिला आहे. प्रेस ॲन्ड रजिस्ट्रेशन ॲक्टाअन्वयें बंगाली प्रकाशनें या ग्रंथालयाला मिळण्याची व्यवस्था झाली आहे. ( सबंध हिंदुस्थानांतील कॉपीराइट पुस्तकेंहि अशा तऱ्हेनें या ग्रंथालयाकडे येणें अगत्याचें आहे. ) सुविख्यात प्राच्यविद्याधुरंधर डॉ. थिबो यांच्याजवळ असलेला दुर्मिळ संस्कृत ग्रंथांचा संग्रह या ग्रंथालयासाठीं विकत घेण्यांत आला. अलीकडे पुस्तकरूपानें मिळालेल्या देणग्यांत सर आशुतोष मुखोपाध्याय या सुप्रसिद्ध पंडितांचा खासगी ग्रंथसंग्रह प्रमुख होय. सर आशुतोषांच्या वंशजांनीं, नॅशनल लायब्ररी म्हणून इम्पीरिअल लायब्ररीचें रूपांतर झाल्यावर, ही उदार देणगी दिलेली आहे. गेल्या शतकांतील साहित्यविषयांतील प्रसिद्ध मर्मज्ञ डॉ. रामदास सेन यांचा ग्रंथसंग्रहहि या ग्रंथालयाला मिळालेला आहे; त्यांत कित्येक दुर्मिळ संस्कृत आणि युरोपीय ग्रंथ आहेत. कांहीं वर्षांपूर्वी हिंदी सरकारनें या राष्ट्रीय ग्रंथालयासाठीं उत्कृष्ट चिनी ग्रंथांचा संग्रह विकत घेतलेला आहे. अमेरिकेंतील स्मिथसोनिअन इन्स्टिटयूट्शीं देवघेवीच्या रूपानें पुस्तकांचा विनिमय सुरू केल्यामुळें त्या संस्थेचीं प्रकाशनें येथें उपलब्ध होतात. त्यांत व्यवसाय आणि स्थापत्यविषयक पुस्तकें विशेष असतात.

" या ग्रंथालयानें पुस्तकें लावून ठेवण्याची स्वतःची नवीन रीत चालू केली आहे. पुस्तकांच्या शिड्या सरकवितां येतील अशा करून पुस्तकें काढणें अधिक सोयीचें केलें आहे. तसेंच हवेंतील दमटपणा व धूळ यांमुळें पुस्तकांची खराबी न व्हावी म्हणून या पुस्तकांच्या शिड्या निर्वात पद्धतीनें, यांत्रिक साह्यानें झटकण्यांत येतात.

" सध्यां येथील ग्रंथसंग्रह बहुश: इंग्रजी असला तरी हिंदुस्थानच्या सर्व भाषांतील प्रकाशनें येथें उपलब्ध होण्याची खटपट ग्रंथालय करीत आहे. येथल्या ग्रंथांची आजची संख्या साडेसात लक्षांच्या आगेमागें आहे. ग्रंथालयानें कांहीं चांगलीं प्रकाशनेंहि प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत मानववंशशास्त्रांवरील भारतीय ग्रंथसूचि व बंगाली व युरोपिअन पुस्तकांच्या दोन ग्रंथकारसूची विशेष महत्त्वाच्या आहेत."

## नाईलचें खोरें आणि सुदान

नुकताच १२ फेब्रुवारी १९५३ रोजीं ईजिप्त व इंग्लंड यांच्यामध्यें करार होऊन सुदानला येत्या तीन वर्षांत स्वतंत्र होण्याचा मार्ग मोकळा झाला आहे. सुदान हा ईजिप्तचाच एक भाग आहे असें ईजिप्तचें म्हणणें असून, तें सकृद्दर्शनीं सयुक्तिक वाटणें साहजिकच आहे. ईजिप्तच्या या मागणीमागील राजकीय हेतु सोडून विचार करावयाचा झाल्यास, सांस्कृतिक व वांशिक दृष्ट्या ईजिप्त व सुदान यांमध्यें कितपत साम्य आहे याचाहि विचार करावा लागेल. या बाबतची कांहींशी कल्पना 'मॉडर्न रिव्ह्यू ' ( नोव्हें. १९५२ ) मध्यें उद्धृत केलेल्या Proche-Orient मधील लेखांतील पुढील माहितीवरून येईल :

नाईल नदीच्या खोऱ्याचा उत्तरप्रदेश ईजिप्तचा

सीमाप्रदेश आहे आणि दक्षिणेकडील भागांत सुदानची राजकीय सीमा आहे. परंतु या दोन्ही देशांच्या भौगोलिक रचनेंत मात्र कांहीं मोठें निराळेपण दिसून येत नाहीं. उगमाकडून म्हणजेच दक्षिणेकडून नदीच्या प्रचंड प्रवाहाबरोबर वाहत येणारी गाळाची माती सांचून ईजिप्तचा उत्तरेकडील प्रदेश सुपीक बनलेला आहे. या खोऱ्यांची भूपृष्ठाची रचना सारखीच आहे. आणि हवामान व वनस्पती यांत होणारा बदल क्रमशः होत गेला आहे. त्यांत अगदीं वेगळें असें स्वरूप नाहीं. एकंदरींत सर्व नैसर्गिक गोष्टी असेंच दाखवितात कीं, या दोन्ही प्रदेशांत गाढ संबंध आढळून येतो आणि त्यांच्यांत एकरूपता आहे. एकाच जमातीनें व्यापलेला, विहिरी व गुरचरणें यांनीं भरलेला भूप्रदेश फक्त राजकीय दृष्ट्या विभक्त होऊन एका भागाचा ईजिप्त व दुसऱ्याचा सुदान अशा सरहद्दी बनल्या आहेत.

भौगोलिक दृष्ट्या हवामान वगैरेंत होणारा बदल जसा हळूहळू व क्रमशः होत गेला आहे तसाच लोकवस्तींतील जमातींतहि क्रमशः बदल झालेला आढळतो. सबंध नाईल खोऱ्यांत हें आढळतें. तेथील लोकांची चामडी, वर्ण, नाकाची ठेवण किंवा केसांची वाढ विचारांत घेतली असतां यांतहि अगदीं परस्परहीं भिन्न असा बदल झालेला आढळत नाहीं. त्यामुळें कांहीं लेखक सुदानचेहि वांशिक दृष्ट्या 'नीग्रो सुदान' व 'कॉकेशियन सुदान' असे दोन विभाग पाडतात, ते केवळ सहज समजण्यापुरते वर्णनात्मक आहेत, शास्त्रीय नव्हेत, असेंच म्हणावें लागतें.

नाईल खोऱ्यांत दोन वंशांचें अधिराज्य होतें. प्रथम हमाइट् (Hamite) लोकांचें व नंतर अरब लोकांचें. हमाइट लोकांच्या स्वाऱ्या लाटेसारख्या एकामागून एक येऊन त्याचा न्यूबियाच्या लोकांवर खूप परिणाम झाला. सुदानमध्येंहि अगदीं नाईलच्या दक्षिण भागापर्यंत हा परिणाम आढळून येतो. मूळच्या नीग्रो लोकांचें व या हेमिटिक वंशाचें तेथें मिश्रण झालें आहे. त्यामुळें अगदीं दक्षिणेकडील सुदानमध्येंहि शुद्ध नीग्रो वंश आहे असें मानणें अशास्त्रीय आहे. ही गोष्ट प्रो. सिलिग्मन् या सुप्रसिद्ध इंग्रज वंशशास्त्र विशारदांनीं एका लेखांत स्पष्ट केली आहे.

हेमिटिक वंशानंतर अरबवंशीय लोकांचा संबंध आला. त्यांनीं आपल्या सेमिटिक वैशिष्ट्यांनीं आणि मुस्लिम धर्मानें नाईल नदीच्या खोऱ्यांत दृढ संबंध प्रस्थापित केले. इस्लामपूर्वींहि सेमिटिक लोक येथें आलेले होते. पण मुस्लिम सेमिटिकांनीं ईजिप्तनंतर नुबियन ख्रिश्चन राजाचा पराभव करून सुदानमध्यें प्रवेश केला. सुदानमध्यें स्थानिक जनतेचें जें अरबीकरण झालें तें अत्यंत शांततापूर्ण मार्गानें परस्पर-संबंधांतून निर्माण झालें. ह्या अरबांचा पूर्वींच्या हेमिटिक लोकांशीं संबंध येऊन त्यांत ते मिसळून गेले. तसेंच मूळ स्थानिक प्रजेपासूनहि ते वेगळे राहिले नाहींत. यामुळेंच पर्शिअन लोकांनीं सुदानविषयीं लिहितांना जो वंश-वर्ण-भेदाचा निर्देश केला आहे तो सयुक्तिकपणें सिद्ध होत नाहीं. ऑक्सफर्डच्या मानवशास्त्रीय महाविद्यालयाचे प्राचार्य प्रा. प्रिचार्ड यांनीं ही गोष्ट स्पष्ट केली आहे. ब्रिटिशांनीं जर दक्षिण व उत्तर नाईल खोऱ्यांतील दळणवळणांत अडथळे आणले नसते तर ही वांशिक एकीकरणाची प्रक्रिया नैसर्गिक गतीनें पुढें पुढें चालत गेली असती. यावरून हें उघड होतें कीं, नाईलच्या खोऱ्यांतील प्रजेमध्यें सर्वत्र हेमिटिक व अरब वंशांचे गुण आढळतात आणि सुदानच्या दक्षिणेकडेच मात्र नीग्रोंचें अस्तित्व विशेष आढळतें. तेथेंहि हेमिटिक वंशाचें मिश्रण आढळतें. अरब वंशाचें वैशिष्ट्य दक्षिण नाईलकडून उत्तरेकडे जावें तसतसें अधिकाधिक आढळतें. परंतु निर्भेळ असा अमुकच वंश असें दाखवितां येणार नाहीं."

## शास्त्रज्ञांच्या सामाजिक जबाबदाऱ्या

डॉ. राधाविनोद पाल यांनीं कलकत्याच्या 'युनिव्हर्सिटी कॉलेज ऑफ सायन्स्' च्या फीजिक्स् स्टूडन्टस् रीयूनिअन या संस्थेला उद्देशून केलेल्या भाषणांतील महत्त्वाचा भाग 'सायन्स ॲन्ड कल्चर' मासिकाच्या सप्टेंबर अंकांत आला आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे :

"सांप्रतचें युग हें मुख्यतः विज्ञानाचें आहे. आपलें दैनंदिन जीवन आणि सामाजिक जीवन हें



अनुक्रमणिका






शास्त्रामुळेंच आहे त्या स्थितीला आलें आहे. खरोखर, शास्त्र आणि समाजजीवन यांमध्यें जिवंत संबंध आहे. शास्त्रज्ञांच्या सामाजिक जबाबदाऱ्या मोठ्या आहेत. त्यांतील कांहीं पुढीलप्रमाणें सांगतां येतील.

“ ( १ ) सरकारचीं प्रधानमंडळें आणि केंद्रें यांच्याशीं शास्त्रज्ञांनीं संघटितपणें संपर्क ठेवून कोटलाहि महत्त्वाचा निर्णय, तत्संबद्ध शास्त्राचें संशोधन लक्षांत न घेतां, घेतला जाणार नाहीं, याची काळजी घ्यावयास पाहिजे. ( २ ) विज्ञान व सामाजिक जीवन यांतील परस्परसंबंध प्रत्यक्षपणें स्पष्ट केला पाहिजे. ( ३ ) शास्त्रांच्या वाढीसाठीं कोणत्या सामाजिक सुधारणा अवश्य आहेत हें दाखवून दिलें पाहिजे. म्हणजे वाईट सामाजिक संघटनेंत विज्ञानाची वाढ कशी खुंटते व विज्ञानाची वाढ खुंटल्यास सामाजिक संस्था कशा अवनत होतात हें निदर्शनास येईल. ( ४ ) युद्धाचीं कारणें नाहींशीं करणें व इतर विधायक सामाजिक व बौद्धिक चळवळी यांत शास्त्रज्ञांनीं सहकार्य दिलें पाहिजे. कारण अणुजन्य भयानक शक्तीच्या प्रादुर्भावानंतर युद्ध म्हणजे मानवाची एक प्रकारें आत्महत्याच ठरणार आहे. ( ५ ) शास्त्रज्ञांनीं जीवनाची बाह्य तपासणी करून थांबतां कामा नये. त्यांनीं आर्थिक उन्नतीच्या व सामाजिक न्यायाबद्दलच्या रचनात्मक चळवळींत भाग घ्यावा असें त्यांना पटवलें पाहिजे. कारण ज्या व्यक्तींचा समाज बनतो त्यांना अधिकाधिक चांगलें जीवन जगतां यावें एवढ्या-साठींच समाजसंस्था असते. ( ६ ) शास्त्रासंबंधीं-च्या चुकीच्या समजुती उघडकीस आणल्या पाहिजेत. उदा०–वंशभेदासंबंधींचे अपसिद्धान्त आणि समाजघातक संघटनांमागील शास्त्रीय गैर-समज. मानवजात एक आहे म्हणून आपण अशा विश्वासानें वागलें पाहिजे कीं, कोणतेंहि राष्ट्र वा व्यक्ति स्वतःपुरती जगूं शकत नाहीं. आपण सर्व एकमेकांचे कुटुंबजन आहोंत. ( ७ ) आरडा-ओरड आणि दुराग्रह यांना भिऊन खरी वस्तुस्थिति दडपली जाऊं नये म्हणून संघटित प्रयत्न करून बुद्धिनिष्ठ चर्चा व टीका यांना अनुकूल वातावरण ठेवलें पाहिजे.

## चीनमधील मुद्रणकलेचा उदय

जानेवारीच्या अखेरीस मुंबईस १ ली अखिल-भारतीय मुद्रकपरिषद् भरली होती. त्या निमित्तानें ‘ टाइम्स् ऑफ इंडिया ’ नें ( २३ जाने. ) कांहीं खास लेखांची पुरवणी काढली होती. त्यांत श्री. के. सी. रामन् यांचा ‘ चिनी मुद्रणकलेचा शोध ’ या नांवाचा माहितीपूर्ण लेख आला होता. त्यांतून पुढील माहिती संकलित केली आहे :

“ चीनमध्यें मुद्रणकलेला सुरुवात होण्यापूर्वी निश्चितपणें सुरू झालेली तत्संबद्ध कला म्हणजे कागद तयार करण्याची होय. चिनी लोकांनीं ही कला अनेक वर्षें गुप्त ठेवली होती. पुढें समरकंदच्या अरबी विजेत्यांना चिनी कैद्यांनीं ती कला सांगितली. ही कला पुढें १२ व्या व १३ शतकांत मूरिश मुसलीमांकडून त्यांच्या स्पॅनिश विजेत्यांना समजली.

“ त्साइ लून यानें इ. स. १०५ च्या सुमारास कागद करावयाबाबतचा अहवाल बादशहापुढें सादर केला तो फान येहनें लिहिलेल्या हान वंशाच्या इतिहासांत नमूद केलेला आहे. त्यापूर्वी लेखन बहुधा बांबूची रुंद पट्टी किंवा रेशमाचें कापड यांवर लिहीत असत. नंतर त्साइ लून यानें झाडाची साल, कपड्याच्या चिंध्या व माशांचा लगदा यांचा उपयोग केला. या कागदाला ‘ सरदार त्साईचा कागद ’ असें नांव मिळालें.

“ धार्मिक सिद्धान्त शिलालेखांत कोरून त्या-वरून शाईनें प्रतिकृति करण्याची क्रिया प्राचीन आहे व याच कृतीवरून लांकडाचे लेखनठसे तयार करून प्रतिकृति करण्याची–म्हणजेच ठशांच्या मुद्रणाची सुरुवात झाली. सर्वांत जुनें, ठशांनीं मुद्रित केलेलें पुस्तक म्हणजे ‘ हीरक-सूत्र ’ नांवाचें सन ८६८ मध्यें तयार झालेलें पुस्तक होय असें म्हणतात. तुआन ह्युआन येथील ग्रंथ-भांडारांत याचीच एक लाकडी ठशांची प्रत व एक दगडी शिला-लेखांचीं प्रत उपलब्ध झाली असून, या दोन्ही प्रती ९ व्या शतकांतील आहेत.

“ यूरोपमध्यें मुद्रणाची सुरुवात स्वतंत्र अक्षरांचे सुटे खिळे तयार करून छापावयास सुरुवात झाली तेव्हांपासून धरतात. ही चिनी ठसेमुद्रणाची

क्रिया पुढील खऱ्या मुद्रणाची पूर्वतयारी असें मानलें जातें. खरी गोष्ट अशी दिसते, कीं चिनी लिपि चित्रलिपि असल्यामुळें व ४० हजार वेगवेगळ्या चिन्हांतून लेखन करावयाचें असल्यामुळें स्वतंत्र अक्षरटंक तेथें निर्माण न होतां ठशांच्या द्वारेंच मुद्रण व्हावें हें स्वाभाविक होतें व या दृष्टीनें ही मुद्रणाचीच सुरुवात मानावयास पाहिजे. युरोपिअन मुद्रण हें मुळाक्षरांच्या लिपीवरून होत असल्यामुळें, युरोपिअनांच्या दृष्टीनें मुद्रणाला सुरुवात स्वतंत्र अक्षरखिळे तयार झाल्याच्या तारखेपासून होय, व तें सयुक्तिक आहे. पण ही प्राथमिक अवस्थेंतील ठसे-मुद्रणाची रीत पुढें फेंग टास यानें नव्या स्वरूपांत चालू केल्यामुळें त्यालाच चिनी मुद्रण-कलेचा जनक मानलें जातें. युरोपांत गटेनबर्गला जसा मुद्रणकलेच्या जनकत्वाचा मान, तसाच चीनमध्यें फेंग टास याला मान आहे.–युरोप व चीन येथील मुद्रणांत वापरली गेलेली मात्र शाई सारख्याच प्रकारची आहे.

" १९०० सालीं एका जाओइस्ट धर्मगुरूला एक सीलबंद ग्रंथभांडार सांपडलें. त्यांत पांचव्या ते १० व्या शतकापर्यंतचीं ग्रंथांचीं हस्तलिखितें उपलब्ध झालीं. यांत जगांतील सर्वांत जुनें मुद्रित पुस्तक उपलब्ध झालें व त्याच्या शेवटीं असें नमूद केलेलें आढळलें कीं, हें पुस्तक ११ मे ८६८ सालीं वॅन्ग चीह यानें आपल्या आईबापांच्या स्मरणार्थ मोफत वांटण्यासाठीं मुद्रित केलें. यापेक्षां अधिक माहिती जरी उपलब्ध नसली तरी यावरून वॅन्ग हाच जगांतील पहिला मुद्रक होता ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते."

**विज्ञानविषयक नोबेल पारितोषिकें**

१९५२ सालचीं शास्त्रीय विषयासंबंधींचीं नोबेल पारितोषिकें मिळविणाऱ्या शास्त्रज्ञांसंबंधींची पुढील माहिती 'सायन्टिफिक अमेरिकन' च्या (डिसें. १९५२) 'सायन्स् ॲन्ड् दि सिटिझन्' या सदरांतून संक्षेपानें उद्धृत केली आहे :

अमेरिकेंतील रट्जर्स् विद्यापीठाचे संशोधक सेल्मन. ए वेक्स्मन् यांना त्यांच्या स्ट्रेप्टोमायसिन औषधाच्या शोधांबद्दल **वैद्यकविषयाचें नोबेल** प्राइझ मिळालें आहे. वेक्स्मन् हे १९१५ पासून सूक्ष्मजंतुविषयक जीवशास्त्राचें संशोधन करीत आहेत. १९३९ पासून त्यांचें लक्ष जमिनींतील जिवंत पेशींचा औषधाकडे उपयोग करण्याकडे लागलें, तें त्यांचा शिष्य ड्यूबॉस याच्या टायरोथ्रायसिनूनामक औषधाच्या शोधामुळें. त्यानंतर हे संशोधक शास्त्रज्ञ व त्यांचा शिष्यवृंद यांनीं सर्वांनीं मिळून १०,००० निरनिराळीं जंतुबीजें (cultures) तपासून पाहिलीं आणि अखेरीस त्यांनीं १९१५ सालींच स्वतंत्रपणें ओळखलेला जो जंतु Streptomyces griseus याच्यापासून तीव्र स्वरूपाचें रोगप्रतिबंधक औषध स्ट्रेप्टोमायसिन तयार केलें. हेंच औषध अजूनपर्यंत तरी क्षयरोगावरील रामबाण औषध आहे.

अमेरिकेंतील स्टॅन्फर्ड विद्यापीठाचे **फेलिक्स् ब्लॉच** आणि हार्वर्ड विद्यापीठाचे **एडवर्ड एम्. परसेल** यांना पदार्थविज्ञानशास्त्रविषयक **नोबेल** प्राइझ विभागून देण्यांत आलें आहे. या दोघांनीं अतिसूक्ष्म परमाणूंच्या रचनेबाबत व गतीबाबत जो महत्त्वाचा शोध वेगवेगळ्या पद्धतीनें व जवळजवळ एकदमच लावला, त्याबद्दल हें पारितोषिक दिलें गेलें आहे. अणूच्या घटक मध्यभागां (nuclei) मधून रेडिओ लहरींशीं तालबद्ध नृत्य करणारीं संयुक्त कंपनें अत्यंत सूक्ष्म प्रक्रियेनें नमूद करण्याची रीत त्यांनीं शोधली आहे.

रसायनविषयक नोबेल पारितोषिक असेंच दोघांत विभागलें गेलें. लंडनच्या 'नॅशनल इन्स्टिट्यूट फॉर मेडिकल रिसर्च' संस्थेंतील **ए. जे. पी. मार्टिन** आणि अबर्डीन विद्यापीठाचे **आर. एल्. एम्. सिन्ज** या दोघांना Partition Chromatography संबंधींच्या शोधासाठीं हें पारितोषिक मिळालें आहे. या शोधामुळें जीवरसायनशास्त्रांत अत्यंत महत्त्वाच्या ठरलेल्या कांहीं संयुक्त द्रव्यांचा लाभ होऊं शकला आहे. त्यांपैकीं कार्बोहायड्रेट्स् व ॲमिनो-असिड्स् हीं द्रव्यें मुख्य होत.

यंदांचें प्रत्येक पारितोषिक ३३ हजार डॉलर्सचें होतें. नोबेल पारितोषिक मिळविणारे हे शास्त्रज्ञ नव्या पिढीच्या शास्त्रज्ञांपैकीं आहेत. मार्टिनचें वय ४२, सिन्जचें ३८, ब्लॉच्चें ४७ आणि पर्सेल याचें वय ४० वर्षांचें आहे.



अनुक्रमणिका






Regd. No. B. 5177

'नवभारत' प्रकाशन-मालेचें प्रकाशन : १ :

# पं क ज

[ लिन युथांग यांच्या कादंबरीचा अनुवाद ]

अनुवादिका : प्रे मा कं ट क

" मराठी कथासाहित्यांत एका अमोलिक कथेची भर "

पानें १६८ : किंमत २ रु.

'नवभारत' प्रकाशन-मालेचें प्रकाशन : २ :

# गीता, टिळक आणि गांधी

## ( कर्मयोग आणि सत्याग्रह )

- गीतेंत काय आहे आणि नाहीं, साधनशुचिता, 'गीतारहस्यां'तील कांहीं विचारांची तपासणी, कर्मयोगांतून सत्याग्रहाकडे—इत्यादि विषयांचें मूलगामी विवेचन.
- श्री. शंकरराव देव, आचार्य शं. द. जावडेकर, आचार्य स. ज. भागवत, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. वा. ल. चिपळुणकर इत्यादींचे लेख.

पानें १४५ : किंमत १ रु.

'नवभारत प्रकाशन-मालेचें प्रकाशन : ३ :

# गीता, कर्मयोग और सत्याग्रह

## ( तिलक और गांधी )

किंमत १ रु.

भूमिका-लेखक

सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक श्री. हरिभाऊ उपाध्याय

प्रकाशक
'नवभारत' प्रकाशनमाला
२११ शनिवार, पुणें २








